# महाराष्ट्र विधानपरिषद

## तिसरे (हिवाळी) अधिवेशन, २०१८

---

### अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी

**प्रश्नांची एकूण संख्या - ५०**

---

### दिनांक १ नोव्हेंबर, २००५ पूर्वी सेवेत आलेल्या शिक्षण सेवकांनाही जुनी पेन्शन लागू करण्याबाबत

**(१) ३५२५ (०३-०५-२०१०). श्री.कपिल पाटील, श्री.जयंत पाटील, श्री.सतीश चव्हाण, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील दिनांक १ नोव्हेंबर, २००५ पूर्वी सेवेत आलेल्या शिक्षण सेवकांनाही जुनीच पेन्शन योजना लागू राहील असे पत्र शालेय शिक्षण विभागाने निर्गमित केले होते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, वित्त विभागाचे दिनांक २८ फेब्रुवारी, २००८ अंशदायी पेन्शन योजनेबाबतच्या परिपत्रकात चुका असून, त्या सुधारण्यात येतील असे आश्वासन शासनाने सन २००८ च्या हिवाळी अधिवेशनात दिले होते, तथापि अद्याप त्यानुसार कार्यवाही झालेली नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, दिनांक १ नोव्हेंबर, २००५ व त्यानंतर नियमित झालेल्या शिक्षकांना उक्त योजनेंतर्गत कार्यरत असलेल्या सेवक/शिक्षक यांच्या भविष्य निर्वाह निधीचे खाते उघडण्याबाबत शासनाने कोणता निर्णय घेतलेला आहे,

(४) असल्यास, दिनांक २८ फेब्रुवारी, २००८ च्या वित्त विभागाच्या परिपत्रकात सुधारणा करण्याबाबत काय कार्यवाही करण्यात आली आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (११-०९-२०१८) :** (१) हे खरे नाही.
(२) हे खरे नाही. शासन निर्णय दिनांक १९/७/२०११ अन्वये कार्यवाही केली आहे.
(३), (४) व (५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## औरंगाबाद येथील स्त्री रुग्णालयास जागा मिळवून देण्याबाबत

**(२) ११७९९ (२२-१२-२०१५). श्री.सतिश चव्हाण, श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, श्री.विक्रम काळे, श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) औरंगाबाद शहरातील स्त्री रुग्णालयासाठी जागा मिळवून देणेसाठी ८ दिवसात बैठक लावणेसाठी मा.सार्वजनिक आरोग्य मंत्री यांनी दिनांक २२ जुलै, २०१५ रोजी वा त्यासुमारास आश्वासन दिले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर प्रकरणी बैठकीचे आयोजन झाले नसल्याने रुग्णालयाच्या जागेचा प्रश्न प्रलंबित आहे, हे खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने त्वरीत बैठक घेऊन रुग्णालयास जागा मिळवून देण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (२८-०८-२०१८) :** (१) हे खरे आहे.
(२) व (३) हे खरे नाही.

दिनांक ३/१०/२०१५ रोजी मा.मंत्री (सार्वजनिक आरोग्य) यांच्या दालनात बैठक घेण्यात आलेली आहे. जिल्हाधिकारी, औरंगाबाद यांनी शासकीय दुध डेअरी, औरंगाबाद येथे न.भु.क्र.१३७८९ चौ.मी. जागा उपलब्ध

करुन देण्याचे तत्वत: मान्य केले असून सदर जागा जिल्हा शल्य चिकित्सक, औरंगाबाद यांच्या नावे हस्तांतरीत करण्याची कार्यवाही सुरु आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## विभागीय आयुक्त कोकण भवन, नवी मुंबई येथील नादुरुस्त वाहनांचे निर्लेखन करण्याबाबत

**(३) १६५५६ (२७-०४-२०१६). श्री.जयंत पाटील :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) विभागीय आयुक्त कार्यालय (जुने सचिवालय) मुंबई येथे गेल्या अनेक वर्षांपासून नादुरुस्त चारचाकी वाहने निर्लेखन न केल्याने गंजलेली आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, नादुरुस्त वाहनांची अपसेट प्राइज (लघुत्तम किंमत) निश्चित करून सदर वाहनांची विक्री न करण्याची कारणे काय आहेत,
(३) तसेच, सदर वाहने निर्लेखित न करणाऱ्या संबंधितांवर शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे ?

**श्री.चंद्रकांत पाटील (३१-०७-२०१८) :** (१) विभागीय आयुक्त कार्यालय (जुने सचिवालय) मुंबई येथे ३ वाहने बंद अवस्थेत आहेत.
(२) व (३) या इमारतीत विभागीय आयुक्तांच्या कार्यालयासहीत १० कार्यालये असून ती वेगवेगळ्या विभागांशी संबंधित आहेत. बंद ३ वाहनांपैकी १ वाहन महसूल विभागाच्या क्षेत्रिय कार्यालयाचे असून २ वाहने इतर विभागाशी संबंधित आहेत. महसूल विभागाशी संबंधित वाहन निर्लेखित करण्यात आले असून सदर वाहनाची हातची किंमत (Upset Price) निश्चित करण्याबाबत उपप्रादेशिक परिवहन अधिकारी, ठाणे यांना कळविण्यात आले असून, त्यांचा अहवाल प्राप्त झाल्यानंतर सदर वाहन विक्रीची कार्यवाही करण्यात येईल. इतर २ वाहनांबाबत नियमानुसार कार्यवाही करण्याबाबत संबंधित विभाग / कार्यालय यांना कळविण्यात आले आहे.

---

## राज्यातील इंग्रजी शाळा मराठी विषय शिकवत नसल्याबाबत

**(४) २०६५४ (१९-०४-२०१७). श्री.आनंदराव पाटील, श्री.रामहरी रुपनवर, श्री.सुभाष झांबड, श्री.शरद रणपिसे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात इंग्रजी माध्यमाच्या शाळांमध्ये मराठी भाषा विषय शिकवणे अनिवार्य असताना राज्यातील इंग्रजी शाळा मराठी विषय शिकवत नसल्याचे माहे मे, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार सदरील प्रकरणातील ज्या इंग्रजी शाळा मराठी शिकवत नसतील त्या शाळांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) असल्यास, सर्व शाळांमधून मराठी विषय सक्तीचा करण्याच्यादृष्टीने शासन काही धोरणात्मक निर्णय घेणार आहे काय,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (२७-०८-२०१८) :** (१) हे खरे नाही.

(२), (३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## पेण (जि.रायगड) तालुक्यातील मिठागराची जागा ॲरो इंजिनिअरींग कंपनीने बळकाविल्याबाबत

**(५) २३४७५ (३०-१२-२०१६). श्री.धनंजय मुंडे, श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पेण (जि.रायगड) तालुक्यातील मिठागराची जागा ॲरो इंजिनिअरींग कंपनीने बळकाविली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर प्रकरणात मौजे कांदळे, येथील मे.ॲरो इंजिनिअरींग लि. यांनी केलेल्या बांधकामास महाराष्ट्र प्रादेशिक व नगररचना अधिनियम १९६६ च्या तरतुदीनुसार परवानगी घेतलेली नसल्याने या बांधकामास तहसिलदार, पेण यांनी नोटीस बजावली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, तहसिलदार यांनी दिलेल्या नोटीसच्या उत्तरादाखल कंपनीने कोणतीच कार्यवाही केलेली नाही, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून संबंधित कंपनीवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१८-०८-२०१८) :** (१) मौजे कांदळे, ता.पेण या गावच्या मिठागरच्या जमिनीच्या बाजूच्या खाजगी मालकीच्या जमिनी मे.ॲरो इंजिनिअरींग कंपनीने मुंबई यांनी कुळवहिवाट व शेतजमिन अधिनियम १९४८ चे कलम ६३-१-अ- नुसार विशेष नगर वसाहत योजनेकरीता शेतकऱ्यांकडून खरेदी केलेल्या आहेत.

(२), (३), (४) व (५) सदर कंपनीने विशेष नगर वसाहत प्रकल्पाकरीता खरेदी केलेल्या जमिनीमध्ये शासन निर्णय दिनांक १६/१०/२००८ मधील तरतूदीनुसार शेतजमिनीच्या खरेदी दिनांकापासून पंधरा वर्षाचे मुदतीमध्ये प्रत्यक्ष वापर करणे बंधनकारक असल्याचे नमूद केले आहे. मात्र संबंधित कंपनीने बांधकाम आराखड्यास सक्षम प्राधिकाऱ्याकडून मंजूरी प्राप्त न केल्याने महाराष्ट्र जमीन महसूल अधिनियम, १९६६ चे कलम ४५ अन्वये कारवाई सुरु करण्यात आली आहे. तसेच अनधिकृत बांधकामाबाबत महाराष्ट्र प्रादेशिक व नगररचना अधिनियम १९६६ अन्वये कारवाई प्रस्तावित करण्यात आली असून महाराष्ट्र जमीन महसूल अधिनियम १९६६ चे कलम ४५ अन्वये तहसिलदार, पेण यांच्याकडून दिनांक १९/०५/२०११, दिनांक ०९/०७/२०१२ व दिनांक २५/०३/२०१३ अन्वये नोटीसा देण्यात आल्या आहेत. सदर नोटीशींविरुध्द सदर कंपनीने अलिबाग येथील दिवाणी न्यायालय रेग्युलर मुकादमा नं २०००८३/२०१३ दाखल केला असून सद्य:स्थितीत प्रकरण न्यायप्रविष्ठ आहे.

---

## मुंबईतील सहकारी गृहनिर्माण संस्थेच्या सदनिकाधारकांकडून पुन्हा पुन्हा मुद्रांक शुल्क आकारीत असल्याबाबत

**(६) २६५२१ (३०-१२-२०१६). ॲड.राहुल नार्वेकर, श्री.आनंद ठाकूर, श्री.हेमंत टकले :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईतील कांचन, गोरेगाव, सूरज, कस्तुर पार्क, बोरिवली व मेधा, कांदिवली (प.), बी.टी.सुजाता, मागाठाणे मुंबई येथील सहकारी गृहनिर्माण संस्थेच्या सदनिकाधारकांनी पूर्वी सदनिका खरेदी करताना मुद्रांक शुल्क भरणा केलेला असताना जुन्या होऊन मोडकळीस आलेल्या सहकारी गृहनिर्माण संस्थेचे पुनर्विकास करण्यासाठी विकासासमवेत करार करतेवेळी दिनांक ९/८/२०१२, ७/४/२०१४, ९/२/२०१५ व ७/९/२०१५ या कालावधीत मुद्रांक शुल्क भरणा केले असतांना पुन्हा पुन्हा संस्थेच्या सभासदांना मिळणाऱ्या सदनिकेवर मुद्रांक शुल्क आकारीत असल्याची माहिती माहे ऑक्टोबर, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, दिनांक ९ मे, २०१४ रोजीच्या महसूल विभागाच्या शासन निर्णयाप्रमाणे एकदा मुद्रांक शुल्क भरल्यानंतर त्या सदनिकेधारकांकडून पुन्हा मुद्रांक शुल्क वसूल करु नये असे शासनाने निदेश दिलेले आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार एकवेळा विकास करारनाम्यावर मुद्रांक शुल्क भरल्यावर व त्यावेळी संस्थेच्या सभासदांना द्यावयाच्या सदनिकेची बांधकाम किंमतीवर (Construction Cost) मुद्रांक शुल्क आकारल्यानंतर पुन्हा सभासदाने सदनिका नोंदणी करताना पुन्हा पुन्हा मुद्रांक शुल्क आकारण्याची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२७-०६-२०१८) :** (१), (२) व (३) शासन परिपत्रक दिनांक ९ मे,२०१४ अन्वये मूळ मालक आणि विकासक यांचे दरम्यान निष्पादित झालेल्या करारानुसार मूळ मालकासाठी बांधिव क्षेत्र हस्तांतरित करताना करण्यात येणाऱ्या अनुषंगिक दस्तऐवजांमुळे मिळकतीचे हस्तांतरण होत नसल्याने अशा दस्तऐवजांवर महाराष्ट्र मुद्रांक अधिनियमाच्या कलम ४ नुसार नाममात्र रुपये १००/- इतके मुद्रांक शुल्क आकारण्यात येते.

नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या दिनांक २३ जून, २०१५ व दिनांक ३० मार्च, २०१७ रोजीच्या परिपत्रकांन्वये विहित केलेल्या अटींनुसार सभासदाचे वैयक्तिक लाभात होणारा दस्त हा पुनर्विकास कराराचा पूरक दस्तऐवज समजता येत नसल्याने त्यास कलम ४ प्रमाणे नाममात्र रुपये १००/- इतक्या रकमेच्या आकारणीची सवलत अनुज्ञेय ठरत नसल्याने अशा रितीने पुनर्विकासाच्या प्रकल्पामध्ये सहकारी गृहनिर्माण संस्थेच्या सभासदाच्या वैयक्तिक लाभात होणाऱ्या दस्तऐवजास सदनिकेसाठीच्या बांधकाम खर्चावर मुद्रांक शुल्क आकारले जाते.

सद्य:स्थितीत नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या उक्त नमुद परिपत्रकाच्या अनुषंगाने आकारावयाच्या मुद्रांक शुल्काबाबतचे प्रकरण मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे न्यायप्रविष्ठ आहे.

---

## गृहनिर्माण संस्थेचे मुद्रांक शुल्क कमी करुन दस्तऐवज अभिनिर्णित करण्याबाबत

**(७) २९५०८ (१३-०४-२०१७). श्री.आनंद ठाकूर :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईतील नगर भूमापन पहाडी, गोरेगाव, पांडुरंग वाडी येथील नभूक्र. ९७ या जागेत कांचन स.गृ.सं. ह्या जुन्या इमारतीच्या पुनर्बांधणीसाठी विकासक मे.सी.एच. पाटील यांचे समवेत दिनांक २९/९/२०१४ रोजी नोंदणीकृत करार करुन सदनिका धारकांचे वैयक्तिक करार अभिनिर्णित करणेकाम मुद्रांक नियंत्रक, बोरिवली, मुंबई यांचेकडे दिनांक ५/११/२०१५ रोजी मुद्रांक शुल्क कमी करुन दस्तऐवज अभिनिर्णित करण्याबाबत सदरहू संस्थेने मागणी केलेली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, दिनांक ९ मे, २०१४ च्या शासन निर्णयाप्रमाणे मुद्रांक शुल्काची आकारणी करावी याकरीता मा.उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ येथील न्यायालयाने जनहित याचिका क्र. ५४/२०११ अन्वये दिनांक १/३/२०१३ रोजी निर्णय दिलेला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून शासन निर्णयानुसार किती गृहनिर्माण संस्थेच्या प्रकरणावर कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२७-०६-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) व (३) मा.उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ येथील न्यायालयाने जनहित याचिका क्र.५४/२०११ अन्वये दिनांक १९ मार्च, २०१४ रोजी दिलेल्या निर्णयानुसार शासनाने दिनांक ०९ मे, २०१४ रोजी शासन परिपत्रक निर्गमित केले आहे.

उक्त परिपत्रकातील सुचनांनुसार, मिळकतीचे मूळ मालक आणि विकासक यांचे दरम्यान निष्पादित झालेल्या करारानुसार मूळ मालकासाठी बांधिव क्षेत्र हस्तांतरित करताना करण्यात येणाऱ्या अनुषंगिक दस्तऐवजांमुळे मिळकतीचे हस्तांतरण होत नसल्याने अशा दस्तऐवजांवर महाराष्ट्र मुद्रांक अधिनियमाच्या कलम ४ नुसार नाममात्र रुपये १००/- इतके मुद्रांक शुल्क आकारण्यात येत आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## गोंदिया जिल्हयातील नद्या-नाल्यातून अवैध रेती उत्खनन रोखण्याबाबत

**(८) ३२२०५ (०७-०८-२०१७). प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) गोंदिया जिल्हयातील नद्या-नाल्यातून रेती, मूरूम यांचे अवैध उत्खनन भूमाफिया व शासकीय अधिकारी यांच्या संगनमताने होत असल्याने शासनाच्या महसूलाचे नुकसान होत असल्याचे दिनांक १ डिसेंबर, २०१६ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने अवैध उत्खनन रोखण्याबाबत तसेच, रेती उत्खनास सहकार्य करणाऱ्या अधिकाऱ्यांवर कारवाई करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०४-०८-२०१८) :** (१) अशी बाब निदर्शनास आली नाही.
(२) गोंदिया जिल्ह्यात जिल्हा व तालुकास्तरावर भरारी पथकांची स्थापना करण्यात आली असून सदर पथकांमार्फत दिनांक ०१ एप्रिल, २०१६ ते ३१ मार्च, २०१७ या कालावधीत वाळू व इतर गौण खनिजाचे अवैध उत्खनन व वाहतूकीच्या १७४० प्रकरणात रुपये २,००,५१,०९२/- इतकी दंडात्मक रक्कम वसुल करण्यात आली आहेत. तसेच २८ प्रकरणात गुन्हे नोंद करण्यात आली आहेत.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## ग्रामीण रुग्णालय तलासरी (जि.पालघर) येथील रिक्त पदे भरण्याबाबत

**(९) ३२३३६ (१८-०८-२०१७). श्री.आनंद ठाकूर :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) ग्रामीण रुग्णालय तलासरी (जि.पालघर) येथे अनेक रिक्त पदे आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, याप्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने सदर रिक्त पदे किती कालावधीत भरण्यात येणार आहेत,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (२९-०८-२०१८) :** (१) हे खरे आहे.

ग्रामीण रुग्णालय, तलासरी, जि.पालघर येथे वैद्यकीय अधिकाऱ्यांची एकूण ३ पदे मंजूर असून २ पदे भरली आहेत व १ पद रिक्त आहे. गट क

च्या एकूण १९ मंजूर पदांपैकी १५ पदे भरलेली असून ४ पदे रिक्त आहेत व गट ड च्या एकूण ७ मंजूर पदांपैकी ३ पदे भरलेली असून ४ पदे रिक्त आहेत. ग्रामीण रुग्णालय, तलासरी येथे वैद्यकीय अधीक्षक वर्ग १ हे पद रिक्त असले तरी उपजिल्हा रुग्णालय, डहाणू येथील वैद्यकीय अधीक्षक यांना सदर पदाचा कार्यभार सुपूर्द करुन कामकाज सुरळीतपणे पार पाडण्यात येत आहे. उपजिल्हा रुग्णालय, कासा येथील एका वैद्यकीय अधिकाऱ्यांची प्रतिनियुक्ती व आर.बी.एस.के. पथकातील ४ वैद्यकीय अधिकाऱ्यांची नियुक्ती करण्यात आली असून सदर वैद्यकीय अधिकारी ग्रामीण रुग्णालय, तलासरी येथे रुग्णसेवा देत आहेत. ग्रामीण रुग्णालय, तलासरी येथे आर.बी.एस.के. पथकातील ३ औषध निर्माण अधिकारी व ३ ए.एन.एम. यांची नियुक्ती करण्यात आली आहे. आश्रमशाळा पथकातील वैद्यकीय अधिकारी या पदाचा अतिरिक्त कार्यभार सोपविण्यात आला आहे.

(२) ग्रामीण रुग्णालयातील वैद्यकीय अधिकाऱ्यांची रिक्त पदे भरण्याबाबतची कार्यवाही सुरु आहे. तसेच गट क व गट ड ची रिक्त पदे भरण्याबाबत लेखी परीक्षा जानेवारी, २०१७ मध्ये घेण्यात आल्या होत्या. सदर परिक्षांचा निकाल जाहिर करण्यात आला असून निवड झालेल्या उमेदवारांना पदस्थापना देण्याबाबतची कार्यवाही करण्यात येत आहे.

(३) रिक्त पदे भरण्याबाबतची कार्यवाही सुरु आहे.

---

## माजलगाव (जि.बीड) तालुक्यातील ग्रामीण रूग्णालयातील अस्वच्छतेबाबत

**(१०) ३३२२७ (१८-०८-२०१७). श्री.विनायकराव मेटे :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात स्वच्छ भारत अभियान उपक्रम चालू असताना माजलगाव (जि.बीड) तालुक्यातील ग्रामीण रूग्णालयात अस्वच्छता निर्माण झाली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर रूग्णालयातील अस्वच्छता दूर करण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (१८-०८-२०१८) :** (१) हे खरे नाही.

माजलगांव (जि.बीड) येथील ग्रामीण रुग्णालयामधील सफाईगार ही २ पदे कार्यरत असून रुग्णालयातील स्वच्छतेची कामे सदर कर्मचाऱ्यांकडून करुन घेतली जात आहेत.
(२) व (३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील तलाठ्याकडून नागरिकांना दिल्या जाणाऱ्या दाखल्यासंदर्भात कायदेशीर तरतूद करण्याबाबत

**(११) ३५५०७ (०३-०१-२०१८). श्री.रामहरी रुपनवर, श्री.सतेज ऊर्फ बंटी पाटील, श्री.शरद रणपिसे, श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील नागरिकांना विविध प्रकारचे दिले जाणारे दाखले कोणत्या नियमाखाली दिले जातात याबाबत महसूल विभागाचे काही परिपत्रक सूचना अथवा काही कायदेशीर तरतूद आहे का अशी विचारणा जळगाव जिल्हा न्यायालय तसेच नवी मुंबईतील पोलीस ठाण्याकडून विचारणा केल्यानंतर राज्यातील सुमारे १५ हजार तलाठ्यांनी दाखले देणे बंद आंदोलन सुरु केल्याचे माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, महाराष्ट्र जमीन महसूल अधिनियम १९६६ नुसार ३६ प्रकारचे दाखले देण्याचे अधिकार तलाठी व मंडळ अधिकारी यांना असताना अनेक ठिकाणी याच दाखल्यांसाठी पोलिसांनी कारवाई केल्यामुळे हे दाखले देणे तलाठी संघाने बंद केले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, तलाठ्यांच्या या आंदोलनामुळे नागरिक, नोकरीसाठी प्रयत्न करणारे युवक, शिक्षण घेणारे विदयार्थी यांना दाखल्यांअभावी अनेक अडचणींना सामना करावा लागत असून सर्वसामान्याची गैरसोय होत आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, शेतकरी, शेतमजूर, निराधार, अपंग, विद्यार्थी, आजारी रुग्ण यांच्यासह सर्वसामान्य जनतेला आवश्यक प्रमाणपत्र व दाखले मिळण्यासाठी शासनाने अद्याप पर्यायी यंत्रणा सुरु केली नाही, हे ही खरे आहे काय,
(५) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने तलाठ्याकडून नागरिकांना दिल्या जाणाऱ्या दाखल्यासंदर्भात कायदेशीर तरतूद करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२१-०८-२०१८) :** (१), (२), (३), (४) व (५) याबाबत महाराष्ट्र राज्य तलाठी संघाकडून शासनाकडे निवेदन प्राप्त झाले आहे.

तलाठी/मंडळ अधिकारी यांना अधिकार अभिलेख संबंधी कागदपत्रे व नकला देण्याचे अधिकार आहेत व ते देण्याचे काम तलाठी/ मंडळ अधिकारी यांचेकडून करण्यात येत आहे.

ई-डिस्ट्रीक्ट प्रकल्पांतर्गत नागरिकांना देण्यात येणारे विविध दाखले व प्रमाणपत्रे यांचे प्रमाणिकरण करणे व दाखले देण्याच्या पध्दतीत सुसूत्रता आणण्याच्यादृष्टीने दिनांक २१ फेब्रुवारी, २०११ व दिनांक ३१ मार्च, २०१२ च्या शासन निर्णयान्वये आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. तलाठी यांनी द्यावयाचा उत्पन्नाचा दाखला देण्याच्या पध्दतीत अधिक सुसूत्रता आणण्यासाठी शासन परिपत्रक दिनांक १८ ऑक्टोबर, २०१७ अन्वये सूचना देण्यात आल्या आहेत.

तसेच उपरोक्त दिनांक २१ फेब्रुवारी, २०११ व दिनांक ३१ मार्च, २०१२ च्या शासननिर्णयामध्ये कांही शब्द प्रयोगांमुळे प्रशासकीयस्तरावर कोणत्याही स्वरुपाची संदिग्धता राहू नये यादृष्टीने दिनांक ३ नोव्हेंबर, २०१७ चे शासन शुध्दीपत्रक निर्गमित करण्यात आले आहे.

राज्यातील बंहूतांश जिल्हाधिकारी यांनी कळविले आहे की, नागरिकांना विविध प्रकारचे दाखले/प्रमाणपत्रे नागरी सुविधा केंद्र, महा ई-सेवा केंद्र यामार्फत देण्यात येतात. काही वेळा आवश्यकतेनुसार अर्जदारांकडून स्वयंघोषणापत्र घेऊन दाखले देण्याची कार्यवाही करण्यात येत आहे.
(६) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यात सातबारा उतारे पूर्णत: ऑनलाईन करण्याबाबत

**(१२) ३५९७५ (०३-०१-२०१८). श्री.आनंदराव पाटील, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्रीमती हुस्नबानू खलिफे : दिनांक १० ऑगस्ट, २०१७ रोजी सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आलेल्या अतारांकित प्रश्नोत्तरांच्या यादी क्रमांक १० मधील प्रश्न क्रमांक २९७१९ ला दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात सातबाराचे उतारे ऑनलाईन उपलब्ध करून देण्याचे काम ९० टक्के पूर्ण झाले असून उर्वरित सातबारा उतारे पूर्णत: ऑनलाईन करण्याबाबत शासनास अजून किती कालावधी लागणार आहे,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने सातबारा उतारे पूर्णत: ऑनलाईन करून सर्वसामान्य नागरिकांना सातबारा उतारे ऑनलाईन पाहण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२७-०७-२०१८)** : (१), (२) व (३) प्रस्तुत प्रकरणी राज्यातील ३५८ तालुक्यांपैकी चंद्रपूर जिल्ह्यातील जिवती तालुका वगळता ३५७ तालुक्यांमध्ये गा.न.नं. ७/१२ चे संगणकीकरणाचे काम पूर्ण झाले असून गा.न.नं. ७/१२ उतारे www.mahabhulekh.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर जनतेला पाहण्याकरीता विनामूल्य उपलब्ध करुन देण्यात

आलेले आहेत. मात्र, गा.न.नं. ७/१२ च्या संगणकीकृत डाटामध्ये अनेक त्रुटी आढळल्याने त्या दुरुस्त करण्यासाठी "ई-फेरफार" आज्ञावलींतर्गत प्रथम एडीट मोड्यूल व नंतर रि-एडीट मोड्यूल उपलब्ध करुन देण्यात आले आहे. त्यामाध्यमातून दिनांक २३/०५/२०१८ पर्यंत राज्यातील ४३९५२ गावांपैकी ४११५३ गावांतील संगणकीकृत गा.न.नं. ७/१२ चा डाटा मूळ हस्तलिखित गा.न.नं. ७/१२ च्या नोंदींवरुन पडताळण्यात आला आहे. सदर सुधारीत डाटाच्या आधारे गा.न.नं. ७/१२ डिजिटली स्वाक्षरीत करण्याची कार्यवाही महसूल यंत्रणेमार्फत सुरु असून ज्या-ज्या गावांत डिजिटल स्वाक्षरीचे काम पूर्ण झाले आहे त्या गावातील गा.न.नं. ७/१२ जनतेस सद्य:स्थितीत विनाशुल्क पहाण्यासाठी व डाऊनलोडसाठी ऑनलाईन उपलब्ध करुन देण्यात येत आहेत. राज्यातील सुमारे २.५० कोटी गा.न.नं. ७/१२ पैकी दिनांक २३/०५/२०१८ पर्यंत सुमारे ३२.५८ लक्ष गा.न.नं. ७/१२ डिजिटली स्वाक्षरीत करण्यात आले असून दिनांक ०१/०८/२०१८ पर्यंत राज्यातील सर्व गा.न.नं. ७/१२ उतारे डिजिटल स्वाक्षरीसह ऑनलाईन उपलब्ध करुन देण्यासाठी शासन प्रयत्नशील आहे.

---

## खेळाडूंबरोबर केलेले करार आणि चित्रपट अभिनेत्यांचे निर्मात्यांबरोबरचे करार नोंदणी मुद्रांक विभागाकडे नोंदविणे बंधनकारक करण्याबाबत

**(१३) ३६१८० (०३-०१-२०१८). श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) क्रिकेट, कब्बड्डी इ. स्पर्धांसाठी खेळाडूंबरोबर केलेले करार आणि चित्रपट अभिनेत्यांचे निर्मात्यांबरोबरचे करार नोंदणी मुद्रांक विभागाकडे नोंदविणे बंधनकारक करण्याबाबत स्थानिक लोकप्रतिनिधींनी दिनांक २९ ऑगस्ट, २०१७ रोजी वा त्यासुमारास शासनाकडे मागणी केलेली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२७-०६-२०१८) :** (१) व (२) क्रिकेट, कब्बड्डी इ. स्पर्धांसाठी खेळाडूंबरोबर केलेले करार आणि चित्रपट अभिनेत्यांचे निर्मात्यांबरोबरचे करार नोंदणी मुद्रांक विभागाकडे नोंदविणे बंधनकारक करण्याबाबत कार्यवाही करण्याची शासनाकडे निवेदनाव्दारे विनंती करण्यात आली आहे, हे खरे आहे.

उक्त निवेदनामध्ये नमुद करार नोंदणी अधिनियमाच्या कलम १७ मध्ये समाविष्ठ करुन नोंदणी व मुद्रांक विभागाकडे नोंदविणे बंधनकारक करणे याची वैधानिक व्यवहार्यता विधी व न्याय विभागाशी विचारविनिमय करुन पडताळण्यात येत आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यामध्ये लिलावापेक्षा जास्त वाळू उपसा होत असल्याबाबत

**(१४) ३६२३८ (०३-०१-२०१८). श्री.धनंजय मुंडे, श्री.सतिश चव्हाण, ॲड.निरंजन डावखरे :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात लिलावापेक्षा कित्येक पट जास्त वाळू उपसा होत असल्याच्या तक्रारी सातत्याने करण्यात येत आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, महसूल, पोलीस यंत्रणा व खनिकर्म अधिकाऱ्यांकडून जाणीवपुर्वक आर्थिक हितसंबंधामुळे कारवाई करण्यात येत नाहीत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, राज्यातील सर्वच नद्या या वाळू तस्करांनी पोखरल्या असल्याने दुष्काळ परिस्थिती निर्माण होणे व पुराचे पाणी शेतात, शहरात घुसण्याचे धोके प्रचंड प्रमाणात वाढलेले आहेत, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०४-०८-२०१८) :** (१) काही जिल्ह्यात अशा प्रकारच्या तक्रारी प्राप्त झाल्या आहेत.

(२) व (३) अशी बाब निदर्शनास आली नाही.

(४) लिलावामध्ये मंजूर परिमाणापेक्षा अधिक वाळूचे उत्खनन केल्याचे निदर्शनास आल्यास, अशा लिलावधारकाविरुध्द लिलाव रद्द करणे, दंडात्मक कारवाई करणे, गुन्हा दाखल करणे इ. स्वरुपाची कारवाई करण्यात येते. तसेच वाळूचे अवैध उत्खनन व वाहतूकीवर कार्यवाही करण्याच्यादृष्टीने प्रत्येक जिल्ह्यात तालुकास्तर व मंडळस्तरावर भरारी पथके गठीत करण्यात आली असून अवैध उत्खनन व वाहतूक करणाऱ्यांविरुध्द महाराष्ट्र जमीन महसूल अधिनियम, १९६६ चे कलम ४८ (७) व (८) नुसार दंडात्मक कार्यवाही करण्यात येते.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## स्टँप ॲक्ट नुसार जमीन/फ्लॉटची प्रत्यक्ष नोंदणी झालेल्या व्यवहारानुसार रेडी रेकनरचे दर ठरविणेबाबत

**(१५) ३६४३९ (०३-०१-२०१८). श्री.गोपिकिशन बाजोरीया :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) स्टँप ॲक्ट नुसार जमीन/फ्लॉटची प्रत्यक्ष नोंदणी झालेल्या व्यवहारानुसार रेडी रेकनरचे दर ठरविणे आवश्यक आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, बाजारात जमिनीची/फ्लॉटच्या किंमती कमी झाल्या तरी शासनाच्या बाजार मुल्यानुसार जादा स्टँप ड्युटी ग्राहकांना भरावी लागते, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२९-०८-२०१८) :** (१), (२) व (३) महाराष्ट्र मुद्रांक (मालमत्तेचे वास्तव बाजारमूल्य निर्धारित करणे) नियम, १९९५ मधील तरतूदीनुसार नोंदणीकृत व्यवहारातील दर, भूसंपादन निवाड्यातील दर, मूल्यांकन तत्वे आणि आवश्यक वाटतील असे इतर तपशील (उदा. स्थानिक चौकशी, वास्तुप्रदर्शनातील दर) विचारात घेऊन, जमीन व इमारतीचे सरासरी दर दशविणारे, वार्षिक मूल्यदर तक्ते निर्गमित केले जातात.

वार्षिक मूल्यदर तक्त्यातील दरानुसार येणारे मूल्य, प्रत्यक्ष विक्री दरापेक्षा जास्त असल्यास, संबंधित पक्षकाराला तथा ग्राहकाला संबंधित मालमत्तेच्या खऱ्या बाजारमूल्याचे निर्धारण करण्यासाठी महाराष्ट्र मुद्रांक अधिनियम, १९५८ चे कलम ३१ नुसार, संबंधित मुद्रांक जिल्हाधिकारी यांच्याकडे अभिनिर्णयासाठी विहित शुल्क भरुन अर्ज दाखल करण्याची मुभा आहे. उक्त तरतूदीनुसार पक्षकार तथा ग्राहकाला मिळकतीच्या खऱ्या मुल्यानुसार मुद्रांक शुल्क भरण्याची मुभा असल्याने, बाजारात जमिनीच्या/फ्लॉटच्या किंमती कमी झाल्या तरी शासनाच्या बाजार मुल्यानुसार जादा स्टँप डयुटी ग्राहकांना भरावी लागते असे म्हणणे वस्तुस्थितीस धरुन नाही.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मौजे पाम (जि.पालघर) येथे सिरॉन ड्रग्ज कंपनीने वहिवाटीचा रस्ता बंद केल्याबाबत

**(१६) ३६९८२ (०३-०१-२०१८). श्री.आनंद ठाकूर : तारांकित प्रश्न क्रमांक २९५११ ला दिनांक ७ एप्रिल, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मौजे पाम (ता.जि.पालघर) येथील सर्व्हे क्र. ३०, ७५/३-ब व १६४ या जमिनीतून स्थानिक शेतकऱ्यांच्या वहिवाटीतील वडिलोपार्जित जागेत सर्वे क्र. ३० मध्ये मे.सिरॉन ड्रग्ज ॲण्ड फार्मास्यूटिकल्स लिमिटेड या कंपनीने मोठा गेट बसविल्यामुळे शेतकऱ्यांचा जाण्या-येण्याचा रस्ता ३/४ वर्षापासून

बंद झालेला असून याबाबत मा.मुख्यमंत्री, मा.महसूल मंत्री, मा.कृषी मंत्री, जिल्हाधिकारी, पालघर, उपविभागीय अधिकारी व तहसिलदार, पालघर यांचेकडे दिनांक २०, २१ व २८ डिसेंबर, २०१६ रोजी वा त्यादरम्यान लेखी निवेदनाद्वारे तक्रारी केलेल्या आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, नायब तहसिलदार/तलाठी यांनी दिनांक १६ डिसेंबर, २०१६ रोजी व दिनांक ७ जानेवारी, २०१७ रोजी तहसिलदार व तलाठी व इतर कर्मचारी यांनी समक्ष जागेवर स्थळ पाहणी करुन लुपिन कंपनीने बनवून दिलेला रस्ता व शेत जमिनीची पाहणी करुनही अद्यापपर्यंत रस्ता खुला केलेला नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय व महाराष्ट्र जमीन महसूल अधिनियम, १९६६ चे कलम १४३ अंतर्गत शेतकऱ्यांचा शेतीचा वहिवाटीतील असलेला रस्ता खुला करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०६-०८-२०१८) :** (१), (२), (३) व (४) मौजे-पाम ता.जि.पालघर येथील स.नं. ३०, ६४, ७५/३ ब व १६४ या जमिनीतून स्थानिक शेतकऱ्यांच्या वहिवाटीतील वडिलोपार्जित जागेत जाणे-येण्याच्या रस्त्यात स.नं. ३० मध्ये मे.सिरॉन ड्रग्ज ॲण्ड फार्मास्यूटिकल्स लिमिटेड या कंपनीने मोठा गेट बसविल्यामुळे शेतकऱ्यांचा जाणे-येणेचा रस्ता बंद केल्याबाबत स्थानिक शेतकऱ्यांनी निवेदनाद्वारे तक्रारी दाखल केलेल्या आहेत.

सदर कंपनीचे पूर्वेकडील गेट व दक्षिणेकडील गेट यापूर्वीच खुले करण्यात आले असून आज रोजी दोन्ही गेट खुले आहेत. तसेच वृंदावन पार्कचे विकासक यांनी पत्रे लावून बंद केलेला रस्ता देखील खुला करण्यात आलेला आहे. मंडळ अधिकारी तारापूर तसेच तलाठी सजा कोलवडे यांनी दिनांक ३०/०१/२०१८ रोजी प्रत्यक्ष पाहणी केली असता सिरॉन कंपनीचे पूर्वेकडील गेट व दक्षिणेकडील लोखंडी गेट खुले आहेत.

---

## कांबा, वाघेरापाडा (ता.कल्याण, जि.ठाणे) येथील आदिवासी शेतकऱ्यांच्या जमिनी भूमाफियांनी बळकावून शासनाचा महसूल बुडविल्याबाबत

**(१७) ३८३१६ (०५-०४-२०१८). श्री.किरण पावसकर, श्री.हेमंत टकले, श्री.आनंद ठाकूर, अॅड.राहुल नार्वेकर, श्रीमती विद्या चव्हाण :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कांबा, वाघेरापाडा (ता.कल्याण, जि.ठाणे) येथील आदिवासी शेतकऱ्यांच्या जमिनी भूमाफियांनी बळकावून त्यावर अनधिकृतपणे खोदकाम व बांधकाम करुन शासनाचा महसूल बुडविल्याची बाब निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदरहू भूमाफिया शासकीय अधिकाऱ्यांच्या संगनमताने गैरव्यवहार करीत असून महसूल बुडविणाऱ्या भूमाफियांना संबंधित अधिकारी पाठीशी घालत असल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने गैरव्यवहार करणाऱ्यां संबंधित दोषी अधिकारी व भूमाफिया यांच्यावर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०४-०८-२०१८) :** (१), (२) व (३) मौजे कांबा, वाघेरापाडा, ता.कल्याण, जि.ठाणे येथील आदिवासी शेतकऱ्यांच्या जमिनी बळकावून त्यावर अनधिकृतपणे खोदकाम केली असल्याची बाब निदर्शनास आली नाही.

तथापि, मौजे कांबा, ता.कल्याण येथील स.नं. ४७/१ अ व ४७/१ ब या जमिनीमधून ११८७ ब्रास माती व ३९१ ब्रास दगड या गौणखनिजांचे अनधिकृत उत्खनन केल्याचे निदर्शनास आल्याने संबंधित कसूरदार यांचेकडून रुपये २८,४५,६९२/- इतकी दंडात्मक रक्कम वसूल करण्यात आली आहे. तसेच मौजे कांबा येथे स.नं. १०८/३ या जमिनीवरुन अनधिकृतपणे उत्खनन केल्याचे आढळून आल्याने संबंधित कसूरदारास रुपये ७,७१,६८०/- इतक्या रक्कमेचे दंडात्मक आदेश पारित करण्यात आले असून नमुना-१, नियम-५

नुसार नोटीस निर्गमित करण्यात आली असून वसूलीची कार्यवाही तहसिलदार, कल्याण यांचे स्तरावर सुरु आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## वसंतराव नाईक शासकीय वैद्यकीय महाविद्यालय यवतमाळ येथे डॉक्टर उपस्थित नसल्याबाबत

**(१८) ३८३४८ (०४-०४-२०१८). श्री.हरिसिंग राठोड : तारांकित प्रश्न क्रमांक ३७०११ ला दिनांक १८ डिसेंबर, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) वसंतराव नाईक शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, यवतमाळ येथे अपघात विभागामध्ये सिनिअर डॉक्टर उपस्थित राहत नसल्याचे माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, अधिष्ठाता यांनी सदर जबाबदारी प्राध्यापक व विभाग प्रमुखावर सोपविलेली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने दोषींवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (०२-०८-२०१८) :** (१) हे अंशत: खरे आहे.
(२) अपघात विभागामध्ये अध्यापकांची नियुक्ती संबंधित विभागप्रमुख व वैद्यकीय अधीक्षक यांच्या सहमतीने करण्यात येते.
(३) व (४) श्री.वसंतराव नाईक शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, यवतमाळ येथील डॉक्टर वैद्यकीय रजा टाकून खाजगी व्यवसाय करीत असलेबाबत जिल्हाधिकारी, यवतमाळ यांच्या चौकशीत निष्पन्न झाल्यानुसार ०२ सहायक प्राध्यापक यांचेविरुध्द विभागीय चौकशी सुरु करण्यात आली आहे. तसेच ०१ प्राध्यापक व ०२ सहयोगी प्राध्यापक यांचेविरुध्द विभागीय चौकशी सुरु करण्याची बाब विचाराधीन आहे.

---

## सातारा जिल्ह्यात विविध ठिकाणी बांधण्यात आलेले जुने पाझर तलावत पाणी साठा होत नसल्याबाबत

**(१९) ३८३९६ (०४-०४-२०१८). श्री.आनंदराव पाटील, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्रीमती हुस्नबानू खलिफे, डॉ.सुधीर तांबे, श्री.जनार्दन चांदूरकर, श्री.रामहरी रुपनवर, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.सुभाष झांबड : तारांकित प्रश्न क्रमांक ३६०२९ ला दिनांक १८ डिसेंबर, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **जलसंधारण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सातारा जिल्ह्यात विविध ठिकाणी सन १९७२ साली बांधण्यात आलेले जुने पाझर तलाव गाळ व माती यांनी पूर्णपणे भरले असल्यामुळे पाणी साठा होत नाही, यामुळे पाण्याची तीव्र टंचाई निर्माण होत असल्यामुळे जुन्या पाझर तलावात साठलेला गाळ व माती काढण्यासाठी मा.लोकप्रतिनिधींनी संबंधितांकडे वारंवार मागणी केल्याचे माहे सप्टेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदरहू पाझर तलावातील गाळ व माती काढण्यासाठी वेगळा निधी उपलब्ध करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (२६-०६-२०१८) :** (१) होय.

(२) राज्यातील धरणामधील गाळ काढणे व तो शेतामध्ये वापरणे यासाठी गाळमुक्त धरण व गाळयुक्त शिवार योजना राबविण्यास शासन निर्णय दिनांक ०६/०५/२०१७ अन्वये मान्यता देण्यात आलेली आहे. त्यासाठी जलयुक्त शिवार अभियानातून आवश्यक निधी उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे. सन २०१६-१७ या वर्षामध्ये सदर योजनेंतर्गत सातारा जिल्ह्यामध्ये लोकसहभागातून ११२ तलावामधील ४६, ४८२ घनमीटर व शासकीय निधीतून ३५ तलावामधून ९,४१,३३० घनमीटर गाळ काढण्यात आलेला आहे. सन २०१७-१८ मध्ये ७५ तलावामधील गाळ काढण्याचे काम प्रगतीपथावर आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## आदिवासीबहुल भागातील जमिनी अवैध मार्गाने बिगर आदिवासींकडे हस्तांतरीत होत असल्याबाबत

**(२०) ३८५६२ (०५-०४-२०१८). श्री.सुभाष झांबड, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.रामहरी रुपनवर, श्री.आनंदराव पाटील, डॉ.सुधीर तांबे : तारांकित प्रश्न क्रमांक ३१२५४ ला दिनांक ७ ऑगस्ट, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्य शासनाने माहे जून, २०१६ मध्ये अधिसूचना काढून आदिवासीबहुल भागातील जमिनी अवैध मार्गाने बिगर आदिवासींकडे हस्तांतरीत होऊ नये म्हणून जमिनीच्या व्यवहारात ग्रामसभेची परवानगी घेणे बंधनकारक केले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या अधिसूचनेत दिनांक १४/११/२०१७ रोजी बदल करुन नवीन अधिसूचना काढून अनु.क्षेत्रातील आदिवासींच्या जमिनी केंद्र किंवा राज्य शासनाच्या महत्त्वपूर्ण विकास योजनांसाठी हव्या असल्यास आणि अशा जमिनी परस्पर करारातून योग्य मोबदला घेऊन विक्री होत असल्यास ग्रामसभेच्या पूर्व परवानगीची गरज नसल्याचे जाहिर केले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, ही अधिसूचना आदिवासींच्या अधिकारांवर निर्बंध आणणारी असल्याने ती त्वरीत रद्द करुन अनुसूचित क्षेत्रातील ग्रामसभेला त्यांचे संवैधानिक अधिकार परत करण्याबाबत शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१२-०६-२०१८) :** (१), (२) व (३) मा.राज्यपाल महोदय यांनी भारतीय राज्यघटनेच्या पाचव्या अनुसूचीमधील परिच्छेद क्र. ५ (१) मधील प्राप्त अधिकारानुसार दिनांक १४/६/२०१६ रोजीची अधिसूचना काढून महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ मधील कलम ३६-अ ची तरतूद राज्यातील अनुसूचित क्षेत्रासाठी सुधारीत केली आहे. त्यानुसार राज्यातील अनुसूचित क्षेत्रातील गावांमध्ये ग्रामसभेची ठरावान्वये मंजूरी मिळाल्याशिवाय

आदिवासी व्यक्तीच्या जमिनीचा भोगवटा बिगर आदिवासी व्यक्तीकडे हस्तांतरीत करण्यास मंजूरी देवू नये अशा आशयाची तरतूद केली आहे.

उक्त नमूद सुधारणेमुळे केंद्र शासन तसेच राज्य शासनाच्या प्रकल्पांचे काम खोळंबून राहू नये व त्यांची कार्यपूर्ती विहित कालमर्यादेत व्हावी याद्दष्टीने निकडीच्या सार्वजनिक प्रकल्पांना ग्रामसभेच्या पुर्वमंजूरीच्या अटीमधून सूट मिळण्याच्याद्दष्टीने दिनांक १४/११/२०१७ रोजीची अधिसूचना काढून महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ मधील कलम ३६-अ मध्ये सुधारणा केली आहे. त्यानुसार अनुसूचित क्षेत्रातील गावांमध्ये आदिवासी व्यक्तींची जमीन शासनाच्या निकडीच्या प्रकल्पांसाठी सामंजस्याने खरेदी करण्यासाठी कलम ३६-अ खालील परवानगी आवश्यक राहणार नाही. मात्र आदिवासी व्यक्तींना पारदर्शकपणे सुयोग्य मोबदला देणे आवश्यक राहील.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील अकाली पडीत जमीन मूळ मालकांना परत करण्याबाबत

**(२१) ३८८४९ (०५-०४-२०१८). डॉ.सुधीर तांबे, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील अकाली पडीत जमीन मूळ मालकांना परत करण्याबाबत सन २०१५ मध्ये तत्कालीन मा.महसूल मंत्री यांनी आश्वासन दिले होते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून अकाली पडीत जमीन वाटपाबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०७-०८-२०१८) :** (१) व (२) राज्यातील अकाली पडीत जमीन मुळ मालकांना परत करण्याबाबत महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ च्या कलम-१८२ मध्ये सन २०१६ च्या महाराष्ट्र अधिनियम क्र.२७,

दिनांक २२/०८/२०१६ अन्वये सुधारणा करण्यात आली आहे. या सुधारणेची अंमलबजावणी करण्यासाठी “महाराष्ट्र जमीन महसूल (जप्त केलेली आणि जिल्हाधिकारी यांच्या व्यवस्थेखाली आणलेली स्थावर मालमत्ता परत करणे) नियम, २०१७ दिनांक ०१ जानेवारी, २०१८ च्या अधिसूचनेन्वये प्रसिध्द करण्यात आले आहेत.
(३) प्रश्न उद्‍भवत नाही.

---

## अलिबाग ते विरार या मल्टिमॉडेल कॉरिडोर या प्रकल्पाबाबत

**(२२) ३९०४९ (०५-०४-२०१८). श्री.बाळाराम पाटील :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) अलिबाग ते विरार या मल्टिमॉडेल कॉरिडोर या प्रकल्पासाठी शासनाने खाजगी वाटाघाटीव्दारे थेट जमीन खरेदी करण्याची प्रक्रिया राबविण्यास सुरुवात केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, जमिनी संपादित करतांना जमीन मालकास विश्वासात घेऊन सध्याच्या रेडीरेकनरच्या अडीचपट्ट जमिनीची किंमत देण्यात येणार आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, अलिबाग ते विरार या दरम्यानचे किती किलोमीटरचे अंतर कमी वेळेत वाहनांना कापता येणार आहे व या रस्त्यावर सायकल व बससाठी स्वतंत्र मार्गिका करण्यात येणार आहे काय,
(४) असल्यास, कॉरिडोर प्रकल्पाच्या कामाची सद्य:स्थिती काय आहे ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२७-०६-२०१८) :** (१) होय हे खरे आहे.
(२) शासन परिपत्रक, दिनांक २५/०१/२०१७ मधील तरतुदीनूसार समितीद्‌वारे दरनिश्चितीची बैठक झाल्यानंतर जमिनीची किंमत ठरवण्यात येत आहे.
(३) व (४) जिल्हाधिकारी, ठाणे यांनी कळविल्यानुसार विषयांकीत जमिनीची संयुक्त मोजणी आणि दुय्यम निबंधक अंबरनाथ यांचेकडून मूल्यांकन बाबतचा अहवाल प्राप्त होताच पुढील कार्यवाही करण्यात येत आहे. तसेच

जिल्हाधिकारी, रायगड यांनी कळविल्यानुसार खाजगी जमिनी खाजगी वाटाघाटीने थेट खरेदी पद्धतीने घेण्याची कार्यवाही सुरु असून शासकीय जमीन प्रकल्प प्राधिकरणाकडे वर्ग करण्यासाठी उप विभागीय अधिकारी, पनवेल यांचेकडून आवश्यक प्रस्ताव जिल्हाधिकारी यांचेकडे सादर करण्यात आलेला आहे.

---

## हिंगोली जिल्हयात समृध्द महाराष्ट्र जनकल्याण योजनेंतर्गत कामे मंजूर करण्यात आल्याबाबत

**(२३) ३९१७० (०४-०४-२०१८). श्री.रामराव वडकुते :** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) हिंगोली जिल्हयात सन २०१७-१८ मध्ये समृध्द महाराष्ट्र जनकल्याण योजनेंतर्गत कामे मंजूर करण्यात आली आहेत, तसेच मंजूर कामे सुरु न झाल्याने तत्संदर्भात स्थानिक लोकप्रतिनिधींनी मा.जलसंधारण मंत्री तसेच स्थानिक कार्यालयाकडे माहे जानेवारी,२०१८ मध्ये तक्रारी केल्या आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, त्यापैकी किती कामे दिनांक ३१ डिसेंबर, २०१७ रोजीपर्यंत सुरु होती,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (०४-०८-२०१८) :** (१) समृध्द महाराष्ट्र जनकल्याण योजनेंर्गत कामे मंजूर केल्याची बाब खरी आहे, तथापि तक्रार केल्याची बाब खरी नाही.

(२) महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण योजनेंतर्गत हिंगोली जिल्हयात माहे डिसेंबर, २०१७ अखेरपर्यंत समृध्द महाराष्ट्र जनकल्याण योजनेंतर्गत सिंचन

विहीरीचे काम ११६८, निर्मल शोषखड्डयांची ४८६, निर्मल शौचालयाची ११९, कल्पवृक्ष फळबाग लागवड ७२, अंकुर रोपवाटीका ३५, नंदनवन वृक्ष लागवड १७, समृध्द ग्रामयोजनेची १२०, अशी एकूण २०१७ कामे प्रगतीपथावर आहेत.
(३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## संचालक, वैद्‌यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय येथील रिक्त पदे भरण्याबाबत

**(२४) ३९२३७ (०४-०४-२०१८). श्री.हरिसिंग राठोड :** सन्माननीय **वैद्‌यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) संचालक, वैद्‌यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय येथे मुख्य प्रशासकीय अधिकारी व प्रशासकीय अधिकारी यांची पदे रिक्त असल्याची बाब माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, प्रशासकीय कामात विलंब होत असून संचालनालयाच्या अधीनस्थ कार्यरत संस्थेतील कामे प्रलंबित आहेत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने मुख्य प्रशासकीय अधिकारी व प्रशासकीय अधिकाऱ्यांची पदे भरण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (०२-०८-२०१८) :** (१) होय.
(२), (३) व (४) वैद्‌यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई येथील मुख्य प्रशासकीय अधिकारी या संवर्गातील ०२ मंजूर पदांपैकी ०१ पद भरले आहे. तसेच प्रशासकीय अधिकारी या संवर्गातील एकूण ०७ मंजूर पदांपैकी ०४ पदे भरण्यात आलेली आहेत. रिक्त पदे पदोन्नतीने भरण्याची कार्यवाही सुरु आहे.

वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयांतर्गत रिक्त पदांचा अतिरिक्त कार्यभार अन्य अधिकाऱ्यांकडे सोपविण्यात आला असून दैनंदिन प्रशासकीय कामकाज सुरळीत सुरु आहे.

---

## अमळनेर (जि.जळगाव) येथील तालुका प्रशासकीय इमारत बांधकामाचा प्रस्ताव प्रलंबित असल्याबाबत

**(२५) ४०१८६ (०४-०४-२०१८). श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) अमळनेर (जि.जळगाव) येथील तालुका प्रशासकीय इमारत बांधकामाचा प्रस्ताव वित्त विभागाची सहमती नसल्यामुळे प्रलंबित असल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, प्रस्तावास संमती नसण्याची कारणे काय आहेत,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने प्रशासकीय इमारत बांधणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१६-०७-२०१८) :** (१) नाही.

(२), (३) व (४) अमळनेर (जि.जळगाव) तालुका प्रशासकीय इमारतीचे अंदाजपत्रक या विभागास प्राप्त झाले असून निधी व निकष या आधारे प्रशासकीय मान्यता देण्याची कार्यवाही प्रगतीत आहे.

---

## अकोला जिल्ह्यातील अकोला-अकोट या रस्त्याची दुरवस्था झाल्याबाबत

**(२६) ४०३४८ (०५-०४-२०१८). श्री.गोपिकिशन बाजोरीया : तारांकित प्रश्न क्रमांक ३५६०५ ला दिनांक १२ डिसेंबर, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) अकोला जिल्हयातील अकोला-अकोट या प्रमुख रस्त्याची दुरवस्था झाली असून सदर रस्त्यांवर अपघाताचे प्रमाण वाढत आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर रस्त्याची निविदा प्रसिध्द होऊन रस्त्यांच्या कामांचे आदेश देवूनही सदर रस्त्यांच्या दुरुस्तीचे काम सुरु झालेले नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०३-०८-२०१८) :** (१) हे अंशत: खरे आहे.

अकोला-अकोट (१६१ A) हा रस्ता राष्ट्रीय महामार्ग म्हणून दर्जोन्नत झाला असून रस्ता सुधारणेचे काम प्रगतीपथावर आहे. पोलिसांच्या प्रथम अंतरीम अहवालानुसार सदर रस्त्यावर दिनांक ३०/०४/२०१८ रोजी वेताळबाबा संस्थानाजवळ राणी ट्रॅव्हल्सची बस चालकाचे हलगर्जीपणामुळे उलटली असल्याचे नमूद केले असून यामध्ये ८ जण किरकोळ जखमी झाले आहेत.
(२) व (३) हे खरे नाही.

सद्य:स्थितीत रस्त्याचे काम प्रगतीपथावर असून यामध्ये प्रामुख्याने sub grade, G.S.B.,पुल व मोऱ्यांची कामे प्रगतीत आहेत. रस्ता सुरक्षिततेच्यादृष्टीने आवश्यक ती खबरदारी जसे सूचना फलक, माहिती फलक, दिशादर्शक फलक, तात्पुरते कठडे इत्यादी कंत्राटदारामार्फत लावण्यात आलेली आहेत.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## तलासरी (जि.पालघर) तालुक्यातील शेतकऱ्यांनी बुलेट ट्रेन प्रकल्पाकरीता जमिनी देण्यास केलेला विरोध

**(२७) ४०४४८ (०५-०४-२०१८). श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.रामहरी रुपनवर : तारांकित प्रश्न क्रमांक ३५३४३ ला दिनांक १२ डिसेंबर, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) तलासरी (जि.पालघर) तालुक्यातील आठ गावातील सरपंच विविध पक्षांच्या पदाधिकाऱ्यांची दिनांक ८ जानेवारी, २०१८ रोजी पंचायत समिती सभागृहात झालेल्या बैठकीत बुलेट ट्रेनमुळे स्थानिकांचा कोणताही फायदा होणार नाही, विकासाच्या नावाने आदिवासी शेतकऱ्यांना जमिनीपासून वंचित केले जात आहे, यासाठी बुलेट ट्रेन प्रकल्पाकरीता जमिनी देण्यास विरोध केला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीनुसार शेतकऱ्यांच्या मागण्यांच्या अनुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहे ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२७-०६-२०१८) :** (१) होय, हे अंशतः खरे आहे.
(२) संपादक संस्थेकडून शासन निर्णय दिनांक १२/०५/२०१५ व दिनांक ३०/०९/२०१५ अन्वये संबंधित शेतकऱ्यांकडून विकल्प मागविण्याकरीता जाहीर नोटीस प्रसिध्द करण्यासाठी उपविभागीय अधिकारी, डहाणू यांचे कार्यालयास कळविण्यात आले आहे. त्यानुसार तलासरी तालुक्यातील ७ गावांची व डहाणू तालुक्यातील १६ गावांची जाहीर नोटीस संबंधित दैनिक वृत्तपत्रात प्रसिद्ध करण्यात आली आहे. तसेच बाधित शेतकऱ्यांच्या मागण्यांबाबत शासनाच्या धोरणात्मक निर्णयानुसार योग्य ती कार्यवाही करण्याची तजवीज जिल्हाधिकारी, पालघर यांचेकडे ठेवण्यात आलेली आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## सोलापूर जिल्ह्यातील शेतकऱ्यांसाठी सामूहिक शेततळ्यांच्या प्रस्तावाबाबत

**(२८) ४०७०० (०४-०४-२०१८). प्रा.डॉ.तानाजी सावंत :** सन्माननीय **कृषी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) सोलापूर जिल्ह्यातील शेतकऱ्यांच्या मागणीनुसार जिल्हा कृषी अधिकारी यांनी सामुदायिक शेततळयांसाठी ५० कोटी रुपयांचा प्रस्ताव शासनाकडे माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान सादर केला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, शेतकरी अद्यावत शेतीकडे वळलेला असतांना त्यांच्या मागणीबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०१-०८-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे.

सदर प्रस्ताव आयुक्त (कृषी) यांच्याकडे सादर करण्यात आला आहे.

(२) राष्ट्रीय फलोत्पादन अभियानांतर्गत सामुहिक शेततळे ही योजना १०० टक्के अनुदानावर बृहन्मुंबई व मुंबई उपनगर वगळता राज्यातील उर्वरित सर्व जिल्ह्यांसाठी राबविण्यात येते. सदर घटकांसाठी मंजूर असलेल्या निधीचे सर्व जिल्ह्यांसाठी समन्याय पध्दतीने वाटप होणे आवश्यक आहे. त्यामुळे उपलब्ध निधीतून एका जिल्ह्यासाठी ५० कोटी मंजूर करणे शक्य होणार नाही. सोलापूर जिल्ह्यातील शेतकऱ्यांनी मागेल त्याला शेततळे या योजनेंतर्गत शेततळयांची मागणी केल्यास त्यांना जिल्ह्यास प्राप्त होणाऱ्या आर्थिक लक्षाकांच्या मर्यादेत शेततळे मंजूर करणे शक्य आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## सोलापूर जिल्ह्यात दुष्काळ निधीत वाढ करुन शेतकऱ्यांना वितरीत करण्याबाबत

**(२९) ४०८३२ (०५-०४-२०१८). श्री.रामहरी रुपनवर, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.शरद रणपिसे, श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.आनंदराव पाटील, श्री.अमरनाथ राजूरकर :** सन्माननीय **मदत व पुनर्वसन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सोलापूर जिल्ह्यात सन २०१५-१६ च्या रब्बी हंगामात दुष्काळ बाधित ठरलेल्या शेतकऱ्यांसाठी शासनाने भरीव मदत निधीचे आश्वासन देऊनही केवळ रुपये ५७ कोटी निधीची तरतूद केली असून सदरहू रक्कमेपैकी ३५ टक्के निधीचे वितरण झाल्याचे दिनांक १२ जानेवारी, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने दुष्काळ निधीत वाढ करुन सदरहू रक्कम शेतकऱ्यांना वितरीत करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०२-०७-२०१८) :** (१) व (२) हे खरे नाही.

रब्बी हंगाम २०१५-१६ मधील बाधित खातेदारांना मदत निधी वितरीत करणेकामी दिनांक २९/१२/२०१६ रोजीच्या शासन निर्णयामध्ये दिलेल्या तरतुदीन्वये सोलापूर जिल्ह्यासाठी रुपये ५७.५३ कोटी इतके अनुदान मागणीचा प्रस्ताव शासनास प्राप्त झाला. त्यानुसार सोलापूर जिल्ह्यास रुपये ५७.५३ कोटी इतके अनुदान वितरीत करण्यात आले.

सदर प्राप्त अनुदानातून माहे जानेवारी, २०१८ अखेर पर्यंत रुपये २९ कोटी अनुदान २,०१,४५५ खातेदारांना वितरीत करण्यात आले आहे. तर दिनांक ३१/०३/२०१८ अखेर एकूण २,९१,०६२/- इतक्या पात्र खातेदारांना रुपये ४१.३७ कोटी वितरीत करण्यात आले.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## तुर्भे येथे सिडकोच्या मालकीच्या जमिनीवर दगडखाण चालविण्यासाठी मुदतवाढ दिल्याबाबत

**(३०) ४०८७५ (०५-०४-२०१८). श्री.ख्वाजा बेग :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) तुर्भे येथे सिडकोच्या मालकीच्या जमिनीवर १० वर्षासाठी (२००६-२०१६) भाडेतत्वावर दगडखाण चालविण्यासाठी सुमारे ७० हून अधिक कंपनीला/व्यक्तींना जमीन दिली होती, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, दगडखाण चालविण्याची मुदत सन २०१६ मध्ये संपली असून २००६ साली दिलेल्या मुदतीमध्ये मुदतवाढीचा कोणता मुद्दा नसतानाही सदर मुदत एक वर्षासाठी वाढवून दिली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, शासकीय मालमत्तेचे वाटप होत असताना शासनाला जास्तीत जास्त फायदा होण्यासाठी व पारदर्शकता ठेवण्यासाठी सदर जागेची मुदत संपल्यानंतर नवीन निविदा प्रक्रिया न राबविता अजून मुदतवाढ देण्याची कारणे काय आहेत,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०४-०८-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२), (३) व (४) ठाणे जिल्ह्यातील नवी मुंबई येथील मौजे तुर्भे, बोनसरी, पावणे, शिरवणे व कुकशेत येथील १३८.०७ हेक्टर इतके वनक्षेत्र केंद्र शासनाच्या अनुमतीने सिडकोकडे वर्ग करण्यात आले आहे. सिडको प्राधिकरणाने या जागेत स्थानिक विस्थापितांना उदरनिर्वाहाचे साधन म्हणून दगडखाण चालविण्याकरीता जिल्हाधिकारी, ठाणे यांचेकडे खाणपट्टा मंजूरीसाठी दाखल केलेल्या प्रस्तावांपैकी नियमोचित खाणपट्टयांच्या प्रस्तावांना जिल्हाधिकारी, ठाणे यांचेकडून दिनांक ३०/९/२०१६ पर्यंत १० वर्षाच्या कालावधीकरीता मंजूरी देण्यात आली होती. तद्नंतर सिडको प्राधिकरणाने सदर जमिनीवरील दगडखाणधारकांचा व्यवसाय चालू ठेवण्यास बाधा येऊ नये तसेच मजूरांची बेरोजगारी उद्‌भवू नये, यासाठी दिनांक ३१/३/२०१७ पर्यंत तात्पुरती खनिपट्टा अनुज्ञप्ती मुदतवाढ दिली आहे. त्यानुषंगाने शिल्लक गौण खनिज साठा उचलण्याकरीता स्वामीत्वधन शासनजमा करुन जिल्हाधिकारी, ठाणे यांनी दिनांक ३१/३/२०१७ पर्यंतचे निर्गत परवाने दिले आहेत.

सिडकोच्या सदर क्षेत्रातील खनिपट्टा धारकांकडून सन २०१६-२०१७ या वित्तीय वर्षात स्वामीत्वधनापोटी रुपये १९.२६ कोटी इतका महसूल शासनास प्राप्त झालेला आहे.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## विक्रमगड (जि.पालघर) येथील आदिवासींना मंजूर घरकुल योजनेतील घरे अपूर्णावस्थेत असल्याबाबत

**(३१) ४१३५६ (१५-०६-२०१८). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे, श्री.रविंद्र फाटक, श्री.जनार्दन चांदूरकर :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) विक्रमगड (जि.पालघर) मध्ये सन २०१५-१६ या काळामध्ये २१७३ घरकुलांना मंजूरी देण्यात आली होती, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त मंजूर घरकुलांपैकी १९८५ घरकुलांचे काम पूर्ण झाले असून १८८ घरकुले अपूर्णावस्थेत आहेत तर सन २०१६-१७ मध्ये

८०९ घरकुलांपैकी फक्त १४३ घरांचे बांधकाम पूर्ण झाले आहे आणि सन २०१७-२०१८ यावर्षी ३१० घरकुलांपैकी एकही घरकुल पूर्ण झालेले नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, घरकुल योजना कागदावरच असल्याने आदिवासींवर बेघर होण्याची वेळ आली आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, याबाबत शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले, तद्नुसार सदर योजना पूर्णात्वास नेण्याच्यादृष्टीने शासनस्तरावर काय कार्यवाही करण्यात आली वा येत आहे,

(५) नसल्यास, सदर योजना पूर्ण न होण्यामागची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (०९-०७-२०१८) :** (१) हे खरे आहे.

(२) विक्रमगड (जि.पालघर) तालुक्यामध्ये सन २०१५-१६ मध्ये इंदिरा आवास योजनेंतर्गत २१७२ मंजूर घरकुलांपैकी २०८६ घरकुले पूर्ण करण्यात आले, सन २०१६-१७ या वर्षामध्ये ८३६ मंजूर घरकुलांपैकी ४६८ घरकुले पूर्ण करण्यात आले व सन २०१७-१८ या वर्षामध्ये प्रधानमंत्री आवास योजनेंतर्गत ३१० मंजूर घरकुलांपैकी १६० घरकुले पूर्ण करण्यात आलेली आहे. उर्वरित सर्व अपूर्ण घरकुलांचे बांधकामे प्रगतीपथावर असून अपूर्ण घरकुलांसंबंधी सर्व संबंधित क्षेत्रिय अधिकाऱ्यांच्या बैठका आयोजित करुन घरकुलाचे कामे पूर्ण करण्याबाबत निदेश देण्यात आलेले आहेत.

(३) हे खरे नाही.

(४) व (५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## वैद्यकीय अभ्यासक्रमाला प्रवेश देताना मराठवाडा विभागात वैद्यकीय प्रवेश संख्या वाढविण्याबाबत

**(३२) ४१४१८ (०८-०६-२०१८). श्री.धनंजय मुंडे, श्री.सतिश चव्हाण, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात वैद्यकिय प्रवेशासाठी तीन विभाग करण्यात आले असून विदर्भ विभागासाठी १२०० जागा, मराठवाडा विभागासाठी ६०० जागा तर राज्यात उर्वरित ठिकाणी ३२०० जागा निर्धारित केलेल्या आहेत, इतर विभागाच्या तुलनेत मराठवाडा विभागात केवळ सहा वैद्यकीय महाविद्यालय असल्याने मराठवाडा विभागातील विद्यार्थ्यांना वैद्यकिय अभ्यासक्रमासाठी (एम.बी.बी.एस.) प्रवेश घेताना अन्याय सहन करावा लागतो, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, जात आणि प्रवर्गनिहाय आरक्षण असतानाही विद्यार्थ्यांना प्रादेशिक आरक्षण व ७०/३० कोटा पद्धत घटना विरोधी असल्याचे स्पष्ट मत मा.सर्वोच्च न्यायालयाने नमूद केले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सन २०१५ पासून अद्यापपर्यंत दरवर्षी नीट परीक्षेच्या विद्यार्थी संख्येनुसार मराठवाडा विभागातील परीक्षार्थी आणि उपलब्ध जागा यांचे गुणोत्तर हे इतर विभागाच्या तुलनेत मराठवाडा विभागावर अन्यायकारक आहे, केवळ कोटा पद्धतीमुळे मराठवाडा विभागातील लाखो विद्यार्थ्यांचे प्रवेश पश्चिम महाराष्ट्र मधील कनिष्ठ महाविद्यालयात केले जात असल्यामुळे मराठवाड्यातील उच्च माध्यमिक व कनिष्ठ महाविद्यालय बंद पडण्याची शक्यता आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, मराठवाडा विभागातील विद्यार्थ्यांमध्ये गुणवत्ता असतानाही त्यांना केवळ प्रादेशिक आरक्षण व कोटा पद्धतीमुळे दर्जेदार महाविद्यालयात प्रवेश मिळत नसल्याने त्यांच्यावर होत असलेला अन्याय दूर करून समान संधीचे धोरण वैद्यकीय प्रवेशासाठी लागू करण्याची मागणी विविध सामाजिक संघटना, विद्यार्थी पालक संघर्ष समिती तसेच, लोकप्रतिनिधींनी दिनांक १७/०५/२०१८ रोजी वा त्यासुमारास मा.वैद्यकीय शिक्षण मंत्री यांच्याकडे केली आहे, हे ही खरे आहे काय,

(५) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने वैद्यकीय अभ्यासक्रमाला प्रवेश देताना प्रादेशिक आरक्षण व कोटा पद्धत रद्द करून समान संधीचे धोरण लागू करून मराठवाडा विभागात वैद्यकीय प्रवेश संख्या वाढविण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (०७-०७-२०१८) :** (१) हे खरे नाही. विदर्भ आणि उर्वरित महाराष्ट्राच्या तुलनेत मराठवाड्यातील वैद्यकीय महाविद्यालयाची संख्या कमी असल्याने तेथे ७० टक्के प्रादेशिक कोट्यांतर्गत कमी जागा उपलब्ध होतात. तथापि, मराठवाड्यातील विद्यार्थ्यांना ३० टक्के राज्यस्तरीय कोट्यांतर्गत विदर्भ आणि उर्वरित महाराष्ट्रातील महाविद्यालयांमध्ये देखील प्रवेश घेता येतो. सन २०१७-१८ या शैक्षणिक वर्षातील प्रवेशाची आकडेवारी विचारात घेता ३० टक्के राज्यस्तर कोटयांतर्गत सर्वात जास्त जागांवर मराठवाड्यातील विद्यार्थ्यांनी प्रवेश प्राप्त केले आहेत.

(२) हे खरे नाही. मा.सर्वोच्च न्यायालयाने प्रवेशाकरीता विभागनिहाय कमाल ७० टक्के कोटा आणि राज्यस्तरीय किमान ३० टक्के कोटा ठेवता येईल असे स्पष्ट केले आहे.

(३) हे खरे नाही. राज्यातील शालेय विद्यार्थ्यांना महाराष्ट्रात त्यांच्या इच्छेनुसार कोठेही प्रवेश घेता येतो. कोटा पध्दतीमुळे मराठवाडा विभागातील काही विद्यार्थी पश्चिम महाराष्ट्रातील कनिष्ठ महाविद्यालयात प्रवेश घेतला असल्याची शक्यता नाकारता येत नाही. तथापि अशा पध्दतीने मोठ्या प्रमाणात विद्यार्थ्यांनी प्रवेश घेतल्याबाबत आढळून आलेले नाही. मराठवाडा विभागातील विद्यार्थ्यांनी पश्चिम महाराष्ट्रात प्रवेश घेतल्यामुळे मराठवाडा विभागातील उच्च माध्यमिक अथवा कनिष्ठ महाविद्यालय बंद पडण्याची शक्यता नाही.

(४) ७०/३० सूत्रानुसार प्रादेशिक आरक्षण रद्द करण्यासंदर्भात शासनास विविध निवेदने प्राप्त झाली आहेत. तसेच, सदर आरक्षण रद्द करण्यासाठी मा.उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ येथे मराठवाडा पालक शिक्षक संघटनेतर्फे रिट याचिका दाखल करण्यात आली आहे.

(५) सदर प्रकरण सध्या न्यायप्रविष्ट असल्याने विलंबाचा प्रश्न उद्भवत नाही.

---

## खर्डी (जि.ठाणे) परिसरात शासकीय जमिनी भूमाफिया जंगलांना आगी लावत असल्याबाबत

**(३३) ४१७०६ (१८-०६-२०१८). श्री.प्रसाद लाड, श्री.सुभाष झांबड, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.जगन्नाथ शिंदे :** सन्माननीय **वने मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) खर्डी (जि.ठाणे) परिसरात शासकीय जमिनी बळकावण्यासाठी भूमाफियांनी जंगलांना आगी लावल्याचे दिनांक ४ एप्रिल, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले असून तेथील अघई व तानसा अभयारण्यात २५० हेक्टर जंगल आगीच्या भक्ष्यस्थानी गेल्याने वृक्ष जळाली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, ठाणे जिल्हयातील वनजमिनींच्या संरक्षणासाठी वन विभागाने पुरेशी उपाययोजना न केल्याने वन विभागाच्या उदासीनतेचा फायदा घेत भूमाफिया ही जागा जप्त करत असल्याने वन जमिनींवर सिमेंटच्या जंगलांचे अतिक्रमण झाल्याचे माहे मे, २०१८ च्या पहिल्या पंधरवड्यात निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, भूमाफियांच्या या कृत्यातून मुंब्रा येथे वन विभागाच्या जागेवर बांधलेली १३ खोल्यांची चाळ वन विभागाने माहे मे, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान जमीनदोस्त केली असून वन विभागाच्या जागेत जिल्हयात अनेक ठिकाणी अनधिकृत बांधकामे व बेकायदेशीर बांधकामे करून भूमाफिया शासनाची जमीन जप्त करत आहेत, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, सदर वनजमिनीच्या रक्षणासाठी नेमलेल्या एका वन रक्षकास ८ ते १० गावांचा मिळून एक बिट देण्यात येतो त्यात साधारण ५०० हेक्टर इतके क्षेत्र येत असून त्याला कोणत्याही आधुनिक सोयी सुविधा नसल्याने एकट्या वनरक्षकास एवढ्या मोठ्या कार्यक्षेत्रावर नियंत्रण ठेवणे शासनाच्या उदासीनतेमुळे अशक्य होत आहे, हे ही खरे आहे काय,

(५) तसेच कसारा, खर्डी, मुरबाड परिसरात फार्म हाऊस बांधण्यासाठी भूमाफिया शासकीय जमिनी बळकावून त्या कमी किंमतीत विकण्याचा व्यवसाय करित असल्यामुळे आसपासच्या परिसरातील पोल्ट्री फार्म, आंबा बागाही जळाल्याने मुंबई-आग्रा महामार्गावरील डोंगर रिकामे झाले आहेत, हे ही खरे आहे काय,

(६) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन प्रतिवर्षी वृक्ष लागवड करणाऱ्या वन विभागाकडून वनजमिनींचे संरक्षण करण्यासाठी कार्यवाही करुन मानवनिर्मित आग लावण्याच्या प्रकाराकडे दुर्लक्ष करणाऱ्या वनाधिकारी व भूमाफियांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे, नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (०९-०७-२०१८) :** (१) शहापूर वन विभागात माहे एप्रिल मध्ये वनवणव्याच्या एकूण ३० घटना घडल्या असून, त्यामध्ये ४९.१० हेक्टर तसेच ठाणे वन्यजीव विभागाचे क्षेत्रात वनवणव्यांच्या ८ घटनामध्ये २७.५० हेक्टर असे एकूण ७६.६० हे. वनक्षेत्र बाधित झाले आहे. सदरचा वणवा हा भुपृष्टालगतची आग या प्रकारातील असून, यामध्ये जंगलातील वाळलेले गवत पालापाचोळा जळून नष्ट होतो. कोणत्याही प्रकारचे वृक्ष जळालेले नाहीत.

(२) व (३) ठाणे जिल्ह्यातील वनजमिनींच्या संरक्षणासाठी वन विभागाने पुरेशी उपाययोजना केलेली आहे. वन जमिनीवर अतिक्रमण झाल्याचे माहे मे, २०१८ च्या पहिल्या पंधरवाड्यात मुंब्रा येथे निदर्शनास आले आहे.

मुंब्रा नियतक्षेत्रातील मौजे कौसा संरक्षित वन येथे दुमजली अतिक्रमण दिसुन आले, याबाबत भारतीय वन नियम, १९२७ अंतर्गत वनगुन्हा नोंदविला असून सदरचे अतिक्रमण निष्कासित केले आहे.

ठाणे वन विभागामध्ये वनपरिक्षेत्रातील अनधिकृत व बेकायदेशीर बांधकामे महानगरपालिका, महसूल विभाग, राज्य राखीव पोलीस दल व वन कर्मचारी यांचे संयुक्त माहिती राबवुन त्वरीत निष्कासित करण्यात येत आहेत.

(४) वनजमिनीच्या रक्षणासाठी नेमलेल्या एका वनरक्षकास ८ ते १० गावांचा मिळून एक बीट देण्यात येतो. त्यात साधारण ५०० हेक्टर इतके क्षेत्र असते. सदर क्षेत्राचे संरक्षणासाठी वनरक्षकांच्या मदतीला हंगामी वनमजूर नेमण्यात येतात. या कार्यक्षेत्रावर वनमजूर, वनरक्षक, वनपाल हे नियंत्रण ठेवीत असतात. अधिक मनुष्यबळाची आवश्यकता भासल्यास विभागीयस्तरावर अथवा उपविभागीय स्तरावर मोहिम राबविण्यात येते.

(५) हे खरे नाही.
(६) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## महावितरण आणि महानिर्मिती कंपन्यांनी जलविद्‌युत विभागाचे वीज देयक थकविल्याबाबत

**(३४) ४२७१६ (२१-०६-२०१८). श्री.प्रसाद लाड :** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्याच्या जलविद्‌युत विभागाच्या मालकीचे २७ जलविद्‌युत प्रकल्प असून ते महानिर्मितीला भाडेपट्टीने चालविण्यास दिले आहे तर करंजवण, वीर, डोलवाल, वाण, शहापूर, माजलगाव, सूर्या या प्रकल्पासह सरदार सरोवर वीज प्रकल्पातून तयार होणारी वीज जलविद्‌युत विभागाकडून थेट महावितरणला दिली जाते त्यानुसार घेतलेल्या विजेचे देयक आणि वीज प्रकल्पाचे भाडे याबाबतचे दर तीन महिन्यांनी करारही झाले आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, कराराप्रमाणे सदरहू महानिर्मिती व महावितरण कंपन्यांनी वीज देयक देण्यास दुर्लक्ष केल्याने महावितरणकडे रुपये २६७ कोटी तर महानिर्मितीकडे रुपये १७३४ कोटी थकबाकी आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, थकीत वीज देयक वसूलीसाठी जलविद्‌युत विभागाने पाठपुरावा करूनही थकबाकी प्राप्त झालेली नाही, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने थकीत वीज देयक वसूलीबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (०९-०७-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे.

राज्याच्या जलविद्‌युत विभागाच्या मालकीचे २७ जलविद्‌युत प्रकल्पांची भाडेपट्टी महाराष्ट्र राज्य विद्‌युत नियामक आयोगाने (MERC) मंजूर केली असून सदर आदेशानुसार महानिर्मिती कंपनीने प्रत्येक तिमाहीला भाडेपट्टी रक्कम जलसंपदा विभागास अदा करणे अनिवार्य आहे.

करंजवण, डोलवहाल, वान, शहानूर, माजलगाव व येवतेश्वर या लहान प्रकल्पांचे परिचलन व देखभाल शासनामार्फत करण्यात येत असून वीज देयकाबाबत महावितरण कंपनीबरोबर वीज खरेदी करार (PPA) स्वाक्षांकित झालेले असून सदर करारानुसार देयके प्राप्त झालेनंतर ४५ दिवसांचे आत महावितरण कंपनीने शासनास ते अदा करावयाची आहे व वीज देयके अदा करण्यास विलंब झाल्यास स्टेट बँक ऑफ इंडिया यांच्या त्या वर्षीच्या कर्ज घेतलेल्या दराच्या २% जास्त (@ २ % per annum above the State Bank of India Short term Lending rate) दराने व्याज आकारण्याची तरतूद देखील या करारात आहे.

सरदार सरोवर व पेंच या आंतरराज्यीय जलविद्युत प्रकल्पांतून महाराष्ट्र राज्याच्या वाट्याची अनुक्रमे २७% व ३३% वीज महावितरण कंपनीच्या ग्रीड मध्ये पुरवली जाते व त्यापोटी महावितरण कंपनी रुपये २.०५ प्रती युनिट या तदर्थ दराने रक्कम अदा करीत आहे. सरदार सरोवर व पेंच या आंतरराज्यीय जलविद्युत प्रकल्पांसंदर्भात महावितरणसोबत स्वतंत्र करारनामा करण्यात आलेला नाही.

(२) अंशत: खरे आहे.

मार्च, २०१८ अखेर महावितरण कंपनीकडून उर्वरित रुपये २२९.८४ कोटी थकबाकी येणे आहे.

मार्च, २०१८ अखेरची उर्वरित थकबाकी रुपये १६९५.१३ कोटी रक्कम महानिर्मिती कंपनीकडून येणे आहे.

(३) होय.

(४) थकीत वीज देयक वसुलीबाबत जलसंपदा विभागामार्फत ऊर्जा विभाग तसेच वित्त विभागाकडे वेळोवेळी शासनाच्या विविध स्तरावरुन पाठपुरावा केलेला आहे तसेच करण्यात येत आहे. प्रधान सचिव (ऊर्जा) यांचेबरोबर दिनांक ०६/१२/२०१७ व अपर मुख्य सचिव (वित्त) यांचेबरोबर दिनांक ३०/११/२०१७ व १३/१२/२०१७ रोजी बैठका झालेल्या असून सचिवस्तरावरुन पाठपुरावा करण्यात येत आहे.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## नागपूर जिल्हयात ट्रामाकेअर सुरु करण्याबाबत

**(३५) ४२७३४ (२१-०६-२०१८). प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.रामदास आंबटकर :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नागपूर सार्वजनिक आरोग्य मंडळांतर्गत सहा जिल्हयामध्ये १४ ट्रामाकेअर युनिटला मंजूरी मिळाली असून आठ ते दहा वर्षाचा कालावधी होऊनही केवळ ८ ट्रामा युनिट सुरु असल्याचे माहे मे, २०१८ च्या दुसऱ्या आठवड्यात निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, नागपूर जिल्हयात एकही ट्रामाकेअर सुरु झाले नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (०९-०७-२०१८) :** (१) होय.

(२) होय.

(३) होय. नागपूर जिल्हयात काटोल, उमरेड व भिवापूर येथे तीन ट्रामा केअर युनिट मंजूर करण्यात आली आहेत. यापैकी काटोल येथील ट्रामा केअर युनिटसाठी काही साधनसामग्री व उपकरणे पुरविण्यात आली असून उर्वरित साधनसामग्री व उपकरणांचा पुरवठा करण्याची कार्यवाही सुरू आहे. उमरेड व भिवापूर येथील ट्रामा केअर युनिटच्या इमारतीचे बांधकाम प्रगतीपथावर आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना शालेय शिक्षण विभागाच्या धर्तीवर कालबध्द पदोन्नती देण्याबाबत

**(३६) ४३१०६ (१५-०६-२०१८). श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण :** सन्माननीय **विमुक्त जाती, भटक्या जमाती व इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील भटक्या, विमुक्त जातीच्या आश्रम शाळेतील कार्यरत लिपीक/सेवक/ कांमाठी/ स्वयंपाकी/ वसतिगृह अधीक्षक/ प्रयोगशाळा सहाय्यक/परिचर/नाईक इत्यादी शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना शालेय शिक्षण विभागाच्या धर्तीवर कालबध्द पदोन्नती देण्याबाबत मा.उच्च न्यायालयाने निर्णय दिला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले त्या निर्णयानुसार शासनस्तरावरुन काय कार्यवाही करण्यात आली वा येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (०२-०७-२०१८) :** (१) अंशतः खरे आहे, काही प्रकरणात मा.उच्च न्यायालयाने निर्णय दिला आहे.
(२) व (३) राज्यातील विजाभज प्रवर्गाच्या आश्रमशाळेतील शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना शालेय शिक्षण विभागाच्या धर्तीवर कालबध्द पदोन्नती देण्याबाबत मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या निर्णयानुसार या विभागाने शासनपत्र दिनांक १०/०३/२०१६ अन्वये ज्या न्यायालयीन प्रकरणांमध्ये मा.उच्च न्यायालयाने याचिकाकर्ता कर्मचाऱ्यांना कालबध्द पदोन्नती योजनेचा लाभ देण्याबाबतचे निर्देश दिले असतील अशा कर्मचाऱ्यांची वैयक्तिक पात्रता शालेय शिक्षण विभागाच्या दिनांक ३०/०४/१९९८ च्या शासन निर्णयानुसार तपासून जर याचिकाकर्ता कर्मचारी कालबध्द पदोन्नती योजनेस पात्र ठरत असल्यास त्यांना सदरहू योजनेचा लाभ देण्याची कार्यवाही करण्याचे निर्देश देण्यात आले आहे.

---

## मुरबाड तालुक्यातील धसई डॅमची दुरवस्था झाल्याबाबत

**(३७) ४३१३४ (१५-०६-२०१८). श्री.आनंद ठाकूर, श्री.हेमंत टकले, श्री.ख्वाजा बेग :** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुरबाड (जि.ठाणे) तालुक्यातील धसई डॅममधील कालव्यात पाणी सोडणाऱ्या विहिरीला खिंडार पडल्याने आसपासच्या शेतांमध्ये पाणी जाऊन

शेतीचे नुकसान झाल्याचे माहे फेब्रुवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, धसई डॅमची देखभाल दुरुस्ती करण्याची जबाबदारी कोकण भवन, नवी मुंबई, उपविभाग रायगड यांच्याकडे देण्यात आली होती, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (३०-०६-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे.

धरणाची दगडी बांधकामातील विमोचक विहिर जुनी झाल्याने विहिरीचा अर्धवर्तुळाकार भाग दिनांक २१/०२/२०१८ रोजी कोसळला आहे. मात्र त्यामुळे शेतकऱ्यांच्या जमिनीत पाणी जावून शेतीचे नुकसान झालेले नाही.

(२) होय.

धसई डॅमची देखभाल, दुरूस्ती करण्याची जबाबदारी कार्यकारी अभियंता, रायगड पाटबंधारे विभाग-२ (बां), कोकणभवन, मुंबई यांच्या अधिपत्याखाली असलेल्या उपअभियंता, रायगड लघू पाटबंधारे उपविभाग-१(बां), ता.कर्जत, जि.रायगड या उपविभागाकडे आहे.

(३) धरणाची दगडी बांधकामातील विमोचक विहिर ३४ वर्षे जुनी झाल्याने विहिरीचा अर्धवर्तुळाकार भाग नैसर्गिकरित्या कोसळल्याने चौकशीचा प्रश्न उद्‌भवत नाही.

धरणाच्या विमोचक विहिरीच्या दुरूस्तीचे अंदाजपत्रक तातडीने बनविण्यात आले असून या अंदाजपत्रकास मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांनी दिनांक १२/०४/२०१८ अन्वये रुपये ७७.१३ लक्ष किंमतीस प्रशासकीय मान्यता प्रदान केली असून पावसाळ्यानंतर निधीच्या उपलब्धतेनुसार सदर काम प्राधान्याने पूर्ण करण्याचे प्रस्तावित आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## नांदेड जिल्ह्यात जलयुक्त शिवार अभियानासह मनरेगाच्या सिंचन विहीरींची कामे अपूर्ण असल्याबाबत

**(३८) ४३४५० (२१-०६-२०१८). श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.शरद रणपिसे :** सन्माननीय **जलसंधारण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नांदेड जिल्ह्यात जलयुक्त शिवार अभियानासह मनरेगाच्या ४ हजार ३१९ सिंचन विहीरींची कामे प्रशासनाच्या दुर्लक्षामुळे अपूर्ण असल्याचे दिनांक ११ मे, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन अपूर्ण कामे पूर्ण करण्याबाबत कोणती कार्यवाही केली तसेच कामे वेळेत पूर्ण न करणाऱ्या दोषी अधिकाऱ्यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (०९-०७-२०१८) :** (१) हे अंशत: खरे आहे.

जलयुक्त शिवार अभियानांतर्गत नांदेड जिल्ह्यात सन २०१५-१६ ते २०१७-१८ मध्ये एकूण ३३,३७४ कामांपैकी ३२,९५९ कामे म्हणजेच ९९ टक्के कामे पूर्ण झाली आहेत.

मनरेगा योजनेंतर्गत नांदेड जिल्ह्यात एकूण १५०१३ सिंचन विहीरींपैकी ९५०७ सिंचन विहीरी पूर्ण करण्यात आल्या आहेत. २१८५ सिंचन विहीरी शेल्फवर असून उर्वरित ३३२१ सिंचन विहीरी प्रगतीपथावर आहेत.

(२) प्रगतीपथावरील सिंचन विहीरी पूर्ण करण्याकरीता विशेष मोहीम राबविण्याचे निर्देश दिनांक ३१ मार्च, २०१८ च्या परिपत्रकान्वये दिलेले आहेत.

(३) प्रश्न उद्‍भवत नाही.

---

## साळव (ता.मुरुड, जि.रायगड) येथे येणाऱ्या पर्यटकांच्या सोयी सुविधेबाबत

**(३९) ४३५८८ (२१-०६-२०१८). श्री.जयंत पाटील, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर :** सन्माननीय **पर्यटन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) साळव (ता.मुरुड, जि.रायगड) येथील गणेश मंदिर, काशिद व नांदगाव बीच, नांदगाव सिध्दीविनायक मंदिर, फणसाड अभयारण्य, मुरूड येथील प्रेक्षणिय राजवाडा, जंजिरा आणि पद्मजलदुर्ग, पुरातन मंदिर, समुद्रकिनारे ही सर्व पर्यटन स्थळे एकाच तालुक्यात पहावयास मिळतात तसेच दरवर्षी ४ ते ५ लाख पर्यटक या स्थळांना भेट देत असून मुरुड शहरात समुद्र किनारी पार्किंग, वीज, स्वच्छता गृह, स्नाहगृह व कपडे बदलण्यासाठी सुविधा उपलब्ध नाही, हे खरे आहे काय,

(२) तसेच मुंबईसह राज्यातील पर्यटकांना रायगड जिल्ह्यातील पर्यटनस्थळांचे आकर्षण वाढले असून स्थानिक प्रशासनाकडून मिळणाऱ्या सुविधांवर ताण पडत असल्याने पायाभूत सुविधांचा अभाव आणि क्षमतेपेक्षा जास्त येणाऱ्या पर्यटकांमुळे तेथील पर्यटनस्थळांचे महत्त्व कमी झाले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, रायगड जिल्ह्यातील पर्यटन विकासासाठी तयार करण्यात आलेल्या विकास आराखड्याला दोन वर्षे होऊनही मंजुरी मिळाली नसल्याचे समजते, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त ठिकाणी शासनाने चौकशी करुन पर्यटकांसाठी आवश्यक असणाऱ्या सोयी-सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी तसेच रायगड जिल्ह्यातील पर्यटनस्थळांचा पर्यटनपूरक विकास व पायाभूत सुविधा विकसित करण्यासाठी कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.जयकुमार रावल (०९-०७-२०१८)** : (१) मुरुड येथील समुद्रकिनारी पुरेशी प्रकाश व्यवस्था करण्यात आलेली आहे. तसेच याठिकाणी स्वच्छतागृह व कपडे बदलण्यासाठी चेंजिंग रुमचे बांधकाम C.S.R. फंडातून सुरु आहे.

(२) अशी बाब नाही.

(३) नाही. रायगड जिल्हा पर्यटन विकास बृहद् आराखड्यास दिनांक १८/१२/२०१७ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे.

(४) मुरुड येथील कामांसाठी पर्यटन विभागामार्फत विविध कामांसाठी सन २०१३-१४ पासून रुपये १२३५.०० लक्ष निधी उपलब्ध करुन दिलेला आहे. रायगड जिल्ह्यातील विविध पर्यटन विकास कामांसाठी प्रादेशिक पर्यटन

विकास योजनेमधून सन २०१५-१६ मध्ये रुपये २५०.०० लक्ष, सन २०१६-१७ मध्ये रुपये २४९.५० लक्ष व सन २०१७-१८ मध्ये रुपये २४७.८५ लक्ष निधी उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे. तसेच जिल्हा वार्षिक योजनेमधून सन २०१५-१६ मध्ये रुपये १७१.३४ लक्ष, सन २०१६-१७ मध्ये रुपये १४५.०० लक्ष व सन २०१७-१८ मध्ये रुपये १५५.०० लक्ष इतका निधी मंजूर करण्यात आलेला आहे.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## भिलारगांव व महाबळेश्वर (जि.सातारा) येथील नागरिकांची गैरसोय घेत असल्याबाबत

**(४०) ४३६६४ (०१-०८-२०१८). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप :** सन्माननीय **मराठी भाषा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) भिलारगांव व महाबळेश्वर (जि.सातारा) हे देशातील पहिले पुस्तकांचे गाव म्हणून सन्मानीत झाले असून सदर गांव अदयाप इंटरनेटच्या दुनियेत सामील न झाल्याने मराठी भाषाप्रेमी व सर्वसामान्य जनतेला आपल्या मुलाबाळांना घेऊन तिथे पोहाचता येत नसल्याचे दिनांक २१ एप्रिल, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन नागरिकांची होणारी गैरसोय थांबविण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०७-०८-२०१८) :** (१) खरे आहे.
(२) भिलार, ता.महाबळेश्वर, जि.सातारा येथील पुस्तकांचे गाव याबाबतची मराठीतील माहिती www.pustakanchgaav.in तसेच इंग्रजी मधील माहिती www.pustakanchgaav.com या दोन संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आली आहे. यामध्ये उपक्रमाची माहिती, भिलार येथे जाण्याचा मार्ग (नकाशे), साहित्य प्रकारानुसार पुस्तकांची दालने (घरे) यांचा नकाशा व

माहिती, निवास व्यवस्था व इतर सुविधा याबाबतची माहिती देण्यात आली आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## अलिबाग (जि.रायगड) तालुक्यातील अवैध वाळू उपसा रोखण्याबाबत

**(४१) ४३६९३ (१९-०६-२०१८). श्री.जयंत पाटील :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) यांत्रिक पद्धतीने खाडीतील वाळू उपसा करण्यास पूर्णपणे बंदी असताना त्याकडे जाणीवपूर्वक दुर्लक्ष करत धरमतर खाडीकिनारी राजरोसपणे वाळू उपसा सुरु असल्याने कुर्डुस, कुसुम्बळे (ता.अलिबाग, जि.रायगड) भागातील किनारपट्टीच्या भातशेतीत समुद्राचे पाणी घुसून हजारो एकर भातशेतीचे नुकसान झाले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदरहू बेकायदेशीर वाळू उपसाबाबत जिल्हाधिकारी, रायगड, तहसिलदार, अलिबाग आदींकडे मागील १ वर्षापासून सातत्याने तक्रारी करण्यात आल्या असतानाही स्थानिक महसूल प्रशासनाने कोणतीही कारवाई केली नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने अवैधरित्या वाळू उपसा करणाऱ्यावर कारवाई करुन अवैध वाळू उपसा रोखण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०६-०७-२०१८) :** (१) व (२) अशी बाब निदर्शनास आली नाही.
(३) दिनांक ३०/५/२०१८ रोजी मंडळ अधिकारी, पोयनाड, तलाठी, शहाबाज व पोलीस विभागामार्फत केलेल्या संयुक्त कारवाईमध्ये पेण-अलिबाग रोड, धरमतर खाडी, शहाबाज-धरमतर पुलाच्या दक्षिण बाजूस ३८ ब्रास अवैध वाळूसाठा जप्त करण्यात येऊन पोयनाड पोलीस ठाणे येथे २५ व्यक्तींविरुध्द गुन्हा दाखल करण्यात आला आहे.

आंबा नदी-धरमतर खाडीमध्ये होणारे रेतीचे अवैध उत्खनन व वाहतूक रोखण्यासाठी तहसिलदार, अलिबाग यांच्या अधिनस्थ तपासणी पथकाने माहे जानेवारी, २०१८ ते मे,२०१८ अखेरपर्यंत केलेल्या कार्यवाहीमध्ये अवैध वाळू वाहतूकीच्या ८ प्रकरणात दंडात्मक कारवाई करुन रुपये २,९१,४५०/- इतकी रक्कम वसूल केली आहे. तसेच जप्त वाळू साठ्याचा लिलाव करुन रुपये ४,५०,१९०/- इतकी रक्कम शासनजमा करण्यात आली आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नाशिक विभागातील जलयुक्त शिवार अभियान पत्रकारिता पुरस्काराचे पारदर्शक परीक्षण करून पुरस्कारार्थींना न्याय मिळण्याबाबत

**(४२) ४३७५६ (२१-०६-२०१८). श्री.सतिश चव्हाण** : सन्माननीय **जलसंधारण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) जलयुक्त शिवार अभियान पत्रकारिता पुरस्कारामध्ये नाशिक महसूल विभागाच्या परीक्षणामध्ये अन्याय झाल्याबाबत मा.मुख्यमंत्री व मा.जलसंधारण मंत्री यांच्याकडे लोकप्रतिनिधींनी दिनांक १० मार्च, २०१८ रोजी वा त्यासुमारास तक्रार केली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, नाशिक विभागाचे फेरपरीक्षण करण्याकरीता शासनाने व कृषी आयुक्तालयाने दिनांक २६ मार्च, २०१८ व दिनांक २३ एप्रिल, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदेश दिले आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांनी कोणतीही कार्यवाही न केल्यामुळे कृषी आयुक्तालय स्तरावरुन नाशिक विभागाचे स्वतंत्र परीक्षण करण्याबाबत विधानपरिषद विरोधी पक्षनेते यांनी दिनांक ३० मे, २०१८ रोजी वा त्यासुमारास मा.मुख्यमंत्री यांच्याकडे मागणी केली, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने नाशिक विभागातील जलयुक्त शिवार अभियान पत्रकारिता पुरस्काराचे पारदर्शक परीक्षण करून पुरस्कारार्थींना न्याय मिळण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (०९-०७-२०१८) :** (१) हे खरे आहे.

याबाबत श्री.जयवंतराव जाधव, मा.वि.प.स. व श्रीमती सीमा हिरे, मा.वि.स.स. यांनी श्री.महेंद महाजन, दै. सकाळ नाशिकचे मुख्य बातमीदार यांच्या प्रस्तावाचा राज्यस्तरावर विचार होण्याबाबत निवेदन दिले आहे.

(२) हे अंशत: खरे आहे.

मा.सदस्यांच्या निवेदनाच्या अनुषंगाने नियमानुसार योग्य ती कार्यवाही करण्याबाबत निर्देश देण्यात आले होते.

(३) हे खरे आहे.

(४) सर्व प्रवेशिकांचा पारदर्शकपणे व गुणवत्तेनुसार विचार करुन पुरस्कारासाठी निवड केली जाते. जलमित्र पुरस्कार बाबतचा दिनांक २८ सप्टेंबर, २०१६ च्या शासन निर्णयानुसार फेरपरिक्षण किंवा स्वतंत्र परिक्षणाबाबत तरतुद नाही.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## अलिबाग, मुरूड, रोहा, सुधागड, माणगाव पेण सह इतर तालुक्यातील (जि.रायगड) आदिवासीवाड्या, ठाकूरवाड्या व धनगरवाड्यामध्ये जाण्यासाठी पक्के रस्ते बांधण्याबात

**(४३) ४३७८३ (२१-०६-२०१८). श्री.जयंत पाटील :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) अलिबाग, मुरूड, रोहा, सुधागड, माणगाव पेण (जि.रायगड) तालुक्यातील आदिवासीवाड्या, ठाकूरवाड्या व धनगरवाड्यामध्ये जाण्यासाठी मुळ रस्त्यांपासून पक्के रस्ते नसल्यामुळे रानावनातून तसेच धारदार दगडगोट्यातून रूग्ण, गर्भवती महिला आदिंना कावड करून रूग्णालयात न्यावे लागते तसेच विद्यार्थी, ग्रामस्थांना याच रस्त्यावरून प्रवास करावा लागतो, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, शासन अशा आदिवासीवाड्या, ठाकूरवाड्या व धनगरवाड्यांचे सर्व्हेक्षण करून सदर दुर्गम भागातील वाड्यांमध्ये पक्के रस्ते बांधण्यासाठी तसेच त्यांच्या मुलभूत सोयी-सुविधांसाठी कोणती उपाययोजना करणार आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (१०-०७-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे. काही आदिवासीवाड्या, ठाकूरवाड्या व धनगरवाड्या बारमाही रस्त्यांनी जोडलेल्या असून काही वाड्या आठमाही रस्त्यांनी जोडलेल्या आहेत.
(२) आदिवासी भागातील २५० पेक्षा जास्त लोकसंख्या असलेली गावे प्रधानमंत्री ग्रामसडक व मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेंतर्गत रस्त्यांनी जोडण्यात येतात. योजनेंतर्गत (Plan) रस्त्यांसाठी रस्ते व पूल दुरुस्ती परिरक्षण कार्यक्रम योजनेंतर्गत (३०५४) निधी उपलब्ध करुन देण्यात येतो.

तसेच गावांतर्गत मुलभूत सोईसुविधांसाठी लोकप्रतिनिधींनी सुचविलेल्या गावांतर्गत मुलभूत सुविधा (२५१५-१२३८) योजनेंतर्गत निधी उपलब्ध करुन देण्यात येतो.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## अंगणवाडी सेविकांना आधार कार्डाशी संलग्न मानधन करण्यात आल्याबाबत

**(४४) ४३७९१ (२१-०६-२०१८). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे :** सन्माननीय **महिला व बालविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मानधन वाढ, निवृत्तीचे वय, संपकऱ्यांवर “मेस्मा” आदिसंदर्भात घेण्यात आलेल्या निर्णयामुळे अंगणवाडी सेविका त्रस्त असतांना त्यांचे मानधन आधार कार्डाशी संलग्न करण्यात आल्याचे माहे जून, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, अंगणवाडी सेविकांचे मानधन प्रलंबित राहिल्यामुळे गुंतेगाव (ता.गेवराई, जि.बीड) येथील अंगणवाडी सेविका नीता भागवत शिंदे ह्यांचे आधार कार्ड संलग्न नसल्यामुळे मानधन बंद करण्यात आल्यामुळे त्यांनी दिनांक ९ जून, २०१८ रोजी अंगणवाडी केंद्रात ओढणीने गळफास लावून आत्महत्या केली असून मागील पाच महिन्यांपासून पगार मिळत नसल्यामुळे (ता.जिंतूर, जि.परभणी) येथील सुमित्रा सवडकर या अंगणवाडी सेविकेनही गळफास लावून आत्महत्या केली, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, यासंदर्भात लोकप्रतिनिधींनी मा.मुख्यमंत्री यांच्याकडे पत्रव्यवहार केला आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने आधार कार्ड संलग्न करण्याच्या घेतलेल्या निर्णयाबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, तसेच त्याचे स्वरुप काय आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (०९-०७-२०१८) :** (१) केंद्र शासनाने अंगणवाडी सेविका, मदतनीस व मिनी अंगणवाडी सेविका यांचे मानधन PFMS (Public Financial Management System) या प्रणालीद्वारे प्रदान करण्याबाबत सूचित केल्यानुसार महिला व बालविकास विभाग, शासन निर्णय दिनांक १४ फेब्रुवारी, २०१७ अन्वये त्यांचे मानधन माहे जून, २०१७ पासून आयुक्तालय स्तरावरुन केंद्र शासनाच्या PFMS (Public Financial Management System) या प्रणालीद्वारे त्यांचे आधार कार्डाशी संलग्न बँक खात्यामध्ये प्रदान करण्याची कार्यवाही करण्यात येत आहे.

या योजनेंतर्गत कार्यरत एकूण १,९७,६५३ अंगणवाडी सेविका, मदतनीस व मिनी अंगणवाडी सेविकांपैकी १,९२,४०५ (९७.३४%) कर्मचाऱ्यांचे आधार कार्ड बँक खात्याशी संलग्न असून माहे मे, २०१८ व जून, २०१८ पर्यंतचे मासिक मानधन PFMS प्रणालीद्वारे त्यांचे बँक खात्यात जमा करण्यात येत आहे.

उर्वरित ५२४८ म्हणजेच २.६६% अंगणवाडी सेविका, मदतनीस व मिनी अंगणवाडी सेविका यांची PFMS प्रणालीमध्ये नोंदणी काही तांत्रिक अडचणीमुळे होऊ शकलेली नाही. त्यांचे प्रलंबित मानधन जुन्या पध्दतीने अदा करणेबाबत दिनांक १७/११/२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली होती. सद्य:स्थितीत दिनांक १३/०६/२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये माहे जुलै, २०१८ पर्यंतचे मानधन जुन्या पध्दतीने प्रकल्प स्तरावरुन अदा करण्याबाबत मान्यता देण्यात आलेली असून त्याबाबतचा आवश्यक निधी प्रकल्पस्तरावर वितरीत करण्यात आलेला आहे.
(२), (३), (४) व (५) श्रीमती नीता भागवत शिंदे, अंगणवाडी मदतनीस यांच्या आत्महत्येच्या तपास पोलीस करीत असून अद्याप तपास पूर्ण झालेला नाही. दोन महिने मानधन देण्यास विलंब झालेला असून सदर विलंबास जबाबदार

असणाऱ्या अधिकारी/कर्मचारी यांच्यावर कारवाई करण्याबाबत मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड यांना आयुक्त, एकात्मिक बालविकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी कळविले आहे.

श्रीमती सुमित्रा सवंडकर (राखुंडे) यांनी कौटुंबिक कारणास्तव आत्महत्या केलेली आहे. त्यांचे मानधन आधारकार्ड बँक संलग्न करण्यास विलंब करणाऱ्या पर्यवेक्षिकेला निलंबित करण्यात आलेले आहे.

---

## राज्यातील विविध धरण प्रकल्पांचे कालवे बंद जलवाहिनीच्या स्वरुपात करण्याबाबत

**(४५) ४३७९२ (२१-०६-२०१८). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे :** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील विविध धरण प्रकल्पांचे कालवे बंद जलवाहिनीच्या स्वरुपात करण्याचा निर्णय माहे जून, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान घेतला असून सदर निर्णयानुसार पुणे जिल्हयातील गुंजवणी, नीरा-देवधर तर सांगली जिल्हयातील टेंभू, ताकारी-म्हैसार, वाकर्डे धरण प्रकल्पांच्या कालव्यांचा समावेश करण्यात येणार आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर निर्णयाची अंमलबजावणी केव्हापासून करण्यात येणार आहे व त्याचे स्वरुप काय आहे,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (०९-०७-२०१८) :** (१) होय.

(२) सदर निर्णयाची अंमलबजावणी कार्यवाही सुरु करण्यात आली आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## सफाळे (ता.जि.पालघर) येथील प्राथमिक आरोग्य केंद्राला ग्रामीण रुग्णालयाचा दर्जा मिळण्याबाबत

**(४६) ४३८२३ (२१-०६-२०१८). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.शरद रणपिसे, श्री.रामहरी रुपनवर, श्रीमती हुस्नबानू खलिफे :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सफाळे (ता.जि.पालघर) येथील प्राथमिक आरोग्य केंद्राला ग्रामीण रुग्णालयाचा दर्जा मिळण्याबाबत पंचायत समिती पालघर (जि.पालघर) यांचा प्रस्ताव दिनांक २० जुलै, २००९ रोजी जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे यांच्याकडे पाठविण्यात आला, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, याबाबत तत्कालीन कृषी व पणन मंत्री यांनी तत्कालीन सार्वजनिक आरोग्य मंत्री यांना दिनांक १९ ऑक्टोबर, २०११ रोजी पत्र पाठवून विनंती केली होती, हे खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, तद्नुसार सफाळे येथे प्राथमिक आरोग्य केंद्राला ग्रामीण रुग्णालयाचा दर्जा देण्याच्यादृष्टीने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (१७-०७-२०१८) :** (१) व (२) हे खरे आहे.

(३) सन २०११ च्या जनगणनेवर आधारीत नवीन रुग्णालय सुरु करणे व सध्याच्या रुग्णालयाचे श्रेणीवर्धन करणे यासाठी जोड-बृहत आराखडा तयार करण्यात येत असून सफाळे येथे ग्रामीण रुग्णालय सुरु करण्याची मागणी निकषानुसार जोड बृहत आराखड्यामध्ये प्रस्तावित करण्याची कार्यवाही सुरु आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मौजे जलसार व टेंभीखोडावे (ता.जि.पालघर) येथे बंधारा बांधण्याबाबत

**(४७) ४३८२४ (२१-०६-२०१८). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.शरद रणपिसे, श्री.रामहरी रुपनवर, श्रीमती हुस्नबानू खलिफे :** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मौजे जलसार व टेंभीखोडावे (ता.जि.पालघर) येथे पाणी टंचाई निर्माण होत असल्याने पाण्याचा प्रश्न सोडविण्यासाठी गट नं. ६८५ ह्या वन जमिनीवर बंधारा बांधण्याची मागणी तेथील सामाजिक कार्यकर्ते तसेच मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा यांनी दिनांक १७ मे, २०१८ रोजी वा त्यासुमारास जलसंपदा विभाग यांच्याकडे केली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने जलसार व टेंभीखोडावे येथे बंधारा बांधण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (०९-०७-२०१८) :** (१) होय.

(२) मौजे जलसार व टेंभीखोडावे येथील साठवण तलावाचे अंदाजपत्रक तयार करण्यात आले आहे. परंतु, सदर दोन्ही पाझर तलाव बांधण्याच्या कामाचे सर्व्हेक्षण करण्यात आलेले असून सदर योजना आर्थिक मापदंडात बसत नाहीत.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबई व उपनगरातील शाळा तुकड्यांच्या वाटप प्रकरणी अनियमितता झाल्याबाबत

**(४८) ४३८३० (१९-०६-२०१८). श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई व उपनगरातील शाळा तुकड्यांच्या गैरव्यवहार प्रकरणी जिल्हाधिकारी मुंबई उपनगर यांना दोन महिन्यात अहवाल सादर करण्याबाबत शासनाने निर्देश दिले होते, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपनगर जिल्हाधिकाऱ्यांकडून अहवाल प्राप्त झाला आहे काय, अहवालात काय निष्कर्ष काढण्यात आले, तसेच मुंबई व उपनगरातील तुकड्या वाटप प्रकरणी अनियमितता झाल्याचे शासनाने मान्य करुन सुध्दा सदर प्रकरणी कारवाई न होण्याची कारणे काय आहेत,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन संबंधितांविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०६-०७-२०१८)** : (१) सदर प्रकरणाची सखोल चौकशी करुन शासनास अहवाल सादर करण्याचे जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांना कळविले आहे.
(२) याबाबत कार्यवाही सुरु आहे.
(३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## पुणे जिल्ह्यातील शाळांवर कारवाई करण्याबाबत

**(४९) ४३८६८ (०१-०८-२०१८). श्री.अनिल भोसले** : सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) पुणे जिल्ह्यातील मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकारांतर्गत (आरटीई) प्रवेश घेतलेल्या विद्यार्थ्यांकडून शाळेने देणगीच्या नावे हजारो रुपये वसूल केल्याचे माहे मे, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले तदनुसार आरटीई अंतर्गत प्रवेश घेणाऱ्या गरीब विद्यार्थ्यांकडून देणगीच्या नावे हजारो रुपये वसूल करणाऱ्या शाळांवर कोणती कारवाई केली वा करण्यात करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०७-०९-२०१८) :** (१) हे खरे नाही.
(२) व (३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## विधवा, निराधार, निराश्रित, परितक्त्या, देवदासी महिलांच्या समस्यांबाबत

**(५०) ४३८६९ (२१-०६-२०१८). श्री.हरिसिंग राठोड :** सन्माननीय **महिला व बालविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) विधवा व निराधार महिलांच्या कल्याणासाठी केंद्र शासनाकडे प्रस्ताव सादर न केल्याने सर्वोच्च न्यायालयाने नाराजी व्यक्त केली असून राज्य शासनास रुपये ५० हजारांचा दंड केल्याचे माहे फेब्रुवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, राज्य शासन विधवा, निराधार, निराश्रित, परितक्त्या, देवदासी या महिलांसाठी कोणती कल्याणकारी उपायोजना राबविणार आहे,
(३) असल्यास, या महिलांचा सर्व्हे करण्यात आला आहे काय, शासनामार्फत विधवा, निराधार, निराश्रित, परितक्त्या, देवदासी महिलांबाबत कोणते धोरण आखण्यात आले आहे ?

**श्रीमती पंकजा मुंडे (०९-०७-२०१८) :** (१) होय.

मा.सर्वोच्च न्यायालयातील याचिका क्र.६५९/२००७ या न्याय प्रकरणात राज्यातील विधवा महिलांच्या पुनर्वसनासाठी केंद्र शासनाच्या महिला व बालविकास मंत्रालयाने तयार केलेल्या Agreed Action Plan संदर्भात केलेल्या कार्यवाहीचा अहवाल राज्य शासनाकडून मागविला होता. केंद्र शासनाच्या Agreed Action Plan मधील मुद्यांसंदर्भात आयुक्त, महिला व बालविकास, पुणे यांनी केंद्र शासनास माहिती उपलब्ध करुन दिली होती. तथापि, त्यातील काही मुद्दे धोरणात्मक असल्यामुळे व याबाबतच्या कार्यवाहीस काही कालावधी लागणार असल्यामुळे या मुद्यांची पुर्तता झालेली नाही. परिणामी सदर न्याय प्रकरणात मा.सर्वोच्च न्यायालयाने दंड भरण्याबाबत निर्देश दिले होते.

(२) व (३) विधवा, निराधार, परितक्त्या, देवदासी यांचेकरीता महिला वसतिगृह, आधारगृह व स्वाधार या योजना शासनामार्फत राबविण्यात येतात. तसेच अशा गरजू महिलांना आवश्यक ती मदत मिळण्यासाठी पोलीस स्टेशनच्या आवारात महिला समुपदेशन केंद्र ही योजना राबविण्यात येते. तसेच महिलांच्या मदतीसाठी १८१ क्रमांकाची हेल्पलाईन कार्यान्वित असून राज्यामध्ये ११ जिल्ह्यात १२ वन स्टॉप क्रायसिस सेंटर सुरु करण्यात आलेली आहे. तसेच देवदासी महिलांच्या बाबतीत देवदासी महिलांचा सर्व्हे करण्यात आलेला आहे. देवदासींकरीता तसेच त्यांच्या मुलींच्या विवाहासाठी राज्य शासनाकडून अनुदान देण्यात येते.

---

**विधान भवन :**
**मुंबई.**

**डॉ. अनंत कळसे**
**प्रधान सचिव,**
**महाराष्ट्र विधानपरिषद.**

मुद्रणपूर्व सर्व प्रक्रिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण: शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई.